# नवभारत

वर्ष २२ वे ]  फेब्रुवारी १९६९  [ अंक ५



वार्षिक वर्गणी ९ रु. ]  [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष बाविसावे | नवभारत | फेब्रुवारी
अंक पांचवा | | १९६९

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा– मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ५३·०० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०·०० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | | २५०·०० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६·०० |
| (७) बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | | २०·०० |
| (८) नवमानवतावाद ... ... ... | | २·५० |
| (९) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३·०० |
| (१०) चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | | ३·०० |
| (११) गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... | | २·५० |
| (१२) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... | | २·०० |
| (१३) सिंधु संस्कृती, ऋग्वद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) | | ४·०० |
| (१४) इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | | ५·०० |
| (१५) लोकशाहाचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... | | २·०० |
| (१६) भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | | २·०० |



अनुक्रमणिका






तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# *महात्मा फुले : विचारसमीक्षा

ज्योतिराव फुले यांच्या चरित्राची अनेक पुस्तके अनेकांनी लिहिली आहेत. त्यातील श्री. धनंजय कीर यांच्या 'फुले चरित्राशिवाय' इतर पुस्तके चरित्रा-बरोबरच प्रचाराच्या उद्देशाने लिहिली गेली आहेत. बऱ्याचशा चरित्रकारांनी ब्राह्मणेतरवादाच्या मुळाशी असलेला अंतिम ध्येयवाद बराचसा डोळचा-आड केल्यामुळे त्या चळवळीला वेळोवेळी स्वराज्य चळवळीच्या विरोधी वळण लागले. 'महात्मा फुले : समग्र वाङमय' या संग्रहामुळे त्याच्या मूलभूत ध्येयवादाकडे वाचकांचे लक्ष वेधेल अशी आम्हास आशा आहे. विसाव्या शतकाच्या मध्यकालात निर्माण झालेल्या भारतीय प्रजासत्ताक राज्याचे अधिष्टान म्हणून आवश्यक असलेल्या आणि मूलभूत मानवी हक्कांच्या आधारावर निर्माण झालेल्या नव्या भारतीय समाजरचनेच्या स्थापनेस आवश्यक असलेली, मानवी समानतेचा पुरस्कार करणारी आणि जातिभेद व धर्मभेद यांना धिःकारणारी विचारसरणी ज्योतिबारावांनी आवेशाने सांगितली, या गोष्टीला आज महत्त्व आहे.

ज्योतिराव फुले यांचे इंग्रजी शिक्षण शालान्त परीक्षेपलीकडे गेले नव्हते हे जरी खरे असले तरी इंग्रजी विद्यारूपी वाघिणीचे दूध जन्मतः जे वाघ नाहीत त्यांना कितीही मिळाले तरी त्यांचे नरव्याघ्र बनू शकत नाहीत. इंग्रजी विद्येमध्ये पारंगत झालेले व विद्यापीठामध्ये उच्च पदव्या संपादन केलेले शेकडो सुशिक्षित भारतात झाले. परंतु ते जन्मतः नरव्याघ्र नव्हेत. त्यात थोडेच नरव्याघ्र होते. त्यांनीच आधुनिक युगाला आवाहन देणारे आणि परंपरागत मध्ययुगीन समाजरचनेला उखडून टाकणारे समाजक्रांतीचे विचार एकाकी राहण्याची पर्वा न करता घोषित केले. या नरव्याघ्राच्या घोषणांनी एकोणिसावे शतक हादरत होते. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारतीय स्वातंत्र्याच्या स्थापनेनंतर ती जुनी समाजरचना आता त्याच विचारांच्या शक्तीमुळे खिळखिळी होऊन कोलमडू पाहत आहे. या पहिल्या नर-व्याघ्रांचे ज्योतिराव फुले हे अग्रणी म्हणून शोभतात.

ज्योतिरावांचा विचार हा मानवी स्वातंत्र्याकडे व समतेकडे नेणारा विचार होता याचे प्रत्यंतर त्यांनी निर्माण केलेल्या सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीतील नेत्यांना फारच उशीरा उमगले. गुलामगिरी या त्यांच्या पुस्तकाची अर्पणपत्रिका त्यांचा उद्देश सूचित करते. गुलामगिरी या पुस्तकाच्या प्रथम आवृत्तीची अर्पणपत्रिका पाहावी. निग्रो गुलामांना मुक्त करण्याकरिता आत्मार्पण-पूर्वक आंदोलन चालविणाऱ्या लोकांना गुलामगिरी हे पुस्तक त्यांनी अर्पण केले आहे.

भारतातील परम्परागत समाजसंस्थांच्या विरुद्ध बंड करणारे पहिले पुरुष म्हणजे ज्योतिबा फुले होत. अशा बंडाची प्रेरणा त्यांना कुठून मिळाली? भारतातील परम्परावादी समाजसंस्थांची व या समाजसंस्थांच्या नियमधर्मांची पकड हजारो वर्षे येथील जन-मनात पक्की बसलेली होती. या ठिकाणी, सामाजिक जन्मसिद्ध उंच-नीचभाव हे

*'महात्मा फुले : समग्र वाङमय' हे पुस्तक साहित्य व संस्कृति मंडळ, महाराष्ट्र राज्य यांच्यातर्फे प्रकाशनाच्या मार्गावर आहे. त्याच्या प्रस्तावनेतील महत्त्वाचा भाग येथे उद्धृत केला आहे.








ईश्वरी संकेताने व माणसांच्या पूर्वकर्माने निर्माण झालेले आहेत; म्हणून यांच्या विरुद्ध प्रयत्न करणे, हे महापाप आहे अशी समजूत होती. या महापापाची म्हणजेच अपवित्रतेची भीति येथील जनमानसात कायम घर करून बसली होती. ही खोलपणे सहस्रावधी वर्षे रुजलेली भीति घालविणारी जबरदस्त प्रेरणा ज्योतिबा फुले यांना कुठून मिळाली? ज्योतिबा फुले यांच्या महात्मतेचे रहस्य जाणण्याकरिता या प्रश्नाचा उलगडा करणे, ही आज अत्यंत आवश्यक अशी गोष्ट आहे. ज्योतिबा फुले यांना जी भयंकर सामाजिक तथ्ये दिसली, ती बंधनश्रृंखला तोडण्याचे जबरदस्त शिक्षण त्यांना कुठून प्राप्त झाले याचे उत्तर शोधणे म्हणजेच त्यांच्या महात्मतेच्या रहस्याचा शोध घेणे होय. नवीन ध्येयांचा प्रत्यय आल्याशिवाय, नवीन प्रकारच्या सामाजिक उद्दिष्टांचा अर्थ समजल्याशिवाय, परम्परागत सामाजिक संस्था नष्ट करण्याची प्रवृत्ती निर्माण होऊ शकत नाही. केवळ विनाशाकरिता विनाश, म्हणून विनाशाकरिता प्रवृत्त होणे हे विध्वंसक अतएव विकृत मनोवृत्तीचे लक्षण आहे. ज्योतिबा फुले यांची मनोरचना अत्यंत निरामय होती, शाश्वत नैतिक सत्याच्या आधारावर त्यांची विचारसरणी अधिष्ठित होती. त्यांना उच्चतर सामाजिक विकासाला कारणीभूत होणाऱ्या निरंतर मूल्यांचा प्रत्यय आला होता. ज्योतिबा हे सत्यशोधक होते. हे सत्य मानवी जीवनाचे नैतिक सत्य होते. त्या चिरंतन सत्याचे स्वरूप म्हणजे विश्व-मानवाच्या मुक्ततेचा सिद्धान्त. हा सिद्धान्त त्यांना आधुनिक पश्चिमी संस्कृतीने दिला व तो त्यांच्या काळी त्यांनाच घेता आला, इतरांना नाही.

सत्यशोधक ज्योतिबा यांनी अनेक पुस्तके व निबंध लिहिले. सत्यशोधक समाज स्थापून त्यांनी सामाजिक आंदोलनाचा प्रयत्न केला. या आंदोलनाच्या मुळाशी काही विधायक स्वरूपाच्या ध्येयाचा विचार होता. हा विचार म्हणजेच मूलभूत मानवी हक्कांचा विचार होय. समाजातील बहुसंख्य जनतेचे सामाजिक शोषण बंद करून सर्व मानवांना मुक्त करणारा विचार म्हणजेच मानवी हक्कांचा विचार होय. 'गुलामगिरी' व "सार्वजनिक सत्यधर्म" ही दोन मुलभूत पुस्तके एकत्र वाचली म्हणजेच त्यांच्या वैचारिक मूल्यांची जाणीव होते. 'गुलामगिरी' मधील विचार हे मुख्यतः विध्वंसक होत. या विध्वंसक विचारातून उत्पन्न झालेल्या प्रश्नांचे उत्तर त्यांच्या विधायक विचारात, म्हणजेच 'सार्वजनिक सत्यधर्म' या पुस्तकात मिळते. "गुलामगिरी" हे पुस्तक वाचले म्हणजे सत्याचा अर्धा भाग मिळतो. अर्धसत्य हे नेहमीच धोकादायक असते. 'गुलामगिरी' तील संदेश आपणास भारतातील परंपरागत, ब्राह्मण-प्रधान, धार्मिक व सामाजिक संस्कृतीच्या विरुद्ध उठाव करण्यास प्रेरित करतो. परंतु समोर असलेल्या परंपरागत समाजसंस्था नष्ट करून त्या जागी स्थानापन्न करावयाच्या सामाजिक संस्था ह्या ज्या तत्त्वांवर आधारलेल्या असल्या पाहिजेत, ती तत्त्वे त्यांनी "सार्वजनिक सत्य धर्म" या पुस्तकात विशद करून सांगितली आहेत. ती तत्त्वे म्हणजे आधुनिक मानवी स्वातंत्र्य, समता आणि विश्वबंधुत्व ही होत. ही तत्त्वे गृहीत धरली म्हणजे ज्योतिबांना दिसलेल्या सत्याचे पूर्ण स्वरूप दृष्टीसमोर येते.

"सार्वजनिक सत्य धर्म" या पुस्तकाचे योग्य व आवश्यक तितके मूल्यमापन केल्याशिवाय, ज्योतिबा जीवनातले जे सत्य शोधण्याकरिता जीवनसंग्राम चालवीत होते, त्याचा खराखुरा अर्थ कळणे अशक्य आहे. हे पुस्तक ज्योतिबांनी अर्धांगाचा झटका आल्यानंतर उजवा हात लुळा झाल्यावर, शरीरातील व्यथा सहन करीत, डाव्या हाताने लिहून पुरे केले आहे. 'गुलामगिरी' मध्ये जे सत्य दाखविले आहे ते अर्धसत्य आहे, त्याची दुसरी बाजू लक्षात घेतली नाही तर ते भयानक ठरेल, अशी त्यांची भूमिका होती. म्हणून शारीरिक व्यथा सहन करीत त्यांनी हे पुस्तक लिहून पार पाडले. ज्योतिबांच्या विश्व-कुटुंबवादाचा 'सार्वजनिक सत्य धर्म' हा जाहीरनामा आहे. भारतीय लोकशाही क्रांतीची मूलभूत तत्त्वे विशद करून सांगणारा तो जाहीरनामा आहे. 'सार्वजनिक








सत्य धर्म' मध्ये ज्योतिबांच्या महात्मतेचे तेजोवलय पूर्ण प्रकट झाले आहे. या तेजोवलयाचे तीन भाग आपल्या दृष्टीसमोर पडतात. ते म्हणजे मूलभूत मानवी हक्क, त्यांवर आधारलेला विश्वकुटुंबवाद, आणि जीवनाचे सत्यस्वरूप प्रकट करणारा बुद्धिवाद हे होत. पश्चिमेकडून म्हणजे आधुनिक पाश्चिमात्य संस्कृतीकडून ज्योतिबांना या तीन प्रेरणा मिळाल्या. या तीन प्रेरणातच त्यांची लोकशाही जीवनदृष्टी सिद्ध होते.

मूलभूत मानवी हक्कांच्या आधारावर विश्वकुटुंब कसे निर्माण होईल व त्याकरिता कशा प्रकारचा वर्तनक्रम व कशा प्रकारची वैचारिक भूमिका स्वीकारली पाहिजे, यासंबंधी 'सार्वजनिक सत्य धर्म' मध्ये ३३ कलमी नियम मांडले आहेत.

ज्योतिबा म्हणतात, "स्त्री अथवा पुरुष, जे एकंदर सर्व गावाचे, प्रांताचे, देशाचे व खंडाचे संबंधात अथवा कोणत्याही धर्मातील स्वतःच्या संबंधात, स्त्री आणि पुरुष या उभयतांनी, अथवा सर्व स्त्रियांनी अथवा पुरुषांनी, एकमेकांत, एकमेकांची कोणत्याही प्रकारची आवडनिवड (भेदभाव) न करता या भूखंडावर आपले एक कुटुंब समजून एकमताने एकजुटीने एकमेकाशी सत्य वर्तन करून राहावे."

"आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने, एकंदर सर्व प्राणिमात्रांना उत्पन्न करतेवेळी, मनुष्यास जन्मतः स्वतंत्र प्राणी म्हणून निर्माण केले आहे; आणि त्यांस आपापसात सारख्या हक्कांचा उपभोग घेण्यास समर्थ केले आहे."

"आपणा सर्वांच्या निर्माण-कर्त्याने, एकंदर सर्व स्त्रियांस अथवा पुरुषांस एकंदर सर्व मानवी हक्काविषयी, आपल्यास पाहिजे तसे विचार, आपल्यास पाहिजे तशी मते बोलून दाखविण्यास, लिहिण्यास आणि प्रसिद्ध करण्यास स्वतंत्रता दिली आहे. परंतु या विचारांपासून व मतांपासून कोणत्याही व्यक्तीचे कोणत्याही प्रकारे नुकसान मात्र होऊ नये अशी खबरदारी ठेवावी; त्यास सत्य वर्तन म्हणतात."

"आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने, एकंदर सर्व स्त्रीपुरुषास, एकंदर सर्व मानवी अधिकारांचे मुख्य धनी केले आहे. त्यातून एखादा मानव, अथवा काही मानवांची टोळी, एखाद्या व्यक्तीवर जबर करू शकत नाही, व त्याप्रमाणे जबर न करणाऱ्यास सत्य वर्तन करणारे म्हणतात."

"आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्याने, सर्व मानव स्त्रीपुरुषास धर्म व राजकीय स्वतंत्रता दिली आहे. जो आपल्यापासून दुसऱ्या एखाद्या व्यक्तीस कोणत्याही तऱ्हेचे नुकसान देत नाही, अथवा जो कोणी आपल्यावरून दुसऱ्या मानवाचे हक्क समजून इतरांस पीडा देत नाही, त्याला सत्य वर्तन करणारा म्हणतात."

"आपणा सर्वांच्या निर्माणकर्त्यास संतोष देण्यासाठी केलेले वर्तन याला सार्वजनिक सत्य म्हणतात. जो कोणी इतर मानवबंधूबरोबर सत्य आचरण करील ती नीति म्हणावी, मग ती स्त्री असो, पुरुष असो, तो कोणीही मानव असो, सत्यशोधक समाजसेवक असो, अथवा एखादा गावटेकरी असो."

"या पृथ्वीच्या पृष्ठभागात जेवढी म्हणून मानवानी पुस्तके लिहिली आहेत, त्यापैकी काही ग्रंथात आरंभापासून शेवटपर्यंत सर्व सार्वजनिक सत्य होय, असे प्रत्येक धर्मपुस्तकात म्हटले आहे. काही व्यक्तींनी त्यावेळच्या प्रसंगात अनुसरून हेकटपणा दाखवून जे धर्म-ग्रंथ लिहिले, ते एकंदर सर्व मानवी प्राण्यांना सारखे हितकारक न होता साहजिकच यामध्ये भेद निर्माण करून टेवले. ते एकमेकांचे मनापासून हेवा व द्वेष करतात. प्रत्येक व्यक्तीस मानवी अधिकारांचा यथायोग्य उपभोग घेता यावा."

"आपल्या या सूर्यमंडळासहित पृथ्वीचा निर्माणकर्ता जर एक आहे तर तिजवरील अनेक देशातील लोकांचे एकमेकांचे वैरभाव माजवून प्रत्येकामध्ये देशाभिमान व धर्माभिमानाचे खूळ व्यर्थ का माजविले आहे? त्याचप्रमाणे या पृथ्वीवरील अनेक देशातील सर्व नद्या महासागरात मिळत असतात, त्यापैकी एका देशातील नदी तेवढी अपवित्र कशी होऊ शकेल? या पृथ्वीच्या पृष्ठभागावार एकंदर सर्व मानवी प्राणी अवयवाने








व बुद्धिकौशल्याने एकसारखे असून त्यांपैकी काही लोक पिढीजात पवित्र बनतात. ते श्रेष्ठ कसे होऊ शकतील? सर्वांना सारखे जन्म-मरण असून ते सर्वांप्रमाणे सद्गुणाने व दुर्गुणाने निपुण नाहीत का? कोणत्याही प्रकारचा भेदाभेद न करता, एकंदर सर्व मानवांपैकी जे कोणी आपल्या कुटुंबाचे पोषण करताना जगाच्या कल्याणासाठी सतत कर्म करीत असतात ते आर्य असो, अथवा अमेरिकेतील असो, अथवा ज्याला तुम्ही नीच मानता असा एखादा (चांडाळ) मृतप असो, ते अन्नदान घेण्यास पात्र आहेत. त्यालाच अन्नदान केल्याने निर्मिकाला आनंद होणार आहे."

वरील विचार वाचले म्हणजे विचक्षण वाचकांच्या ध्यानात येते की हे विचार भारतातील लोकशाही क्रान्तीच्या अग्रदूताचे विचार होत. सर्व मानवांचे जे जीवन व्यक्ति-स्वातंत्र्य आणि समता यांनी भरले आहे, ते सामाजिक जीवन हेच पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य होय, अशा तऱ्हेचा निर्वाळा ज्योतिबा अनेक ठिकाणी देतात. पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य ही कल्पना ज्योतिबांना ख्रिश्चन धर्मापासून मिळाली असावी असे स्पष्ट दिसते. आदर्श लोकशाही-जीवनपद्धति आणि विश्वकुटुंब यांस पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य असे ज्योतिबा म्हणतात. ख्रिश्चन कल्पनेवर ज्योतिबांनी नव्या मानवी मूल्यांच्या कल्पनेचा संस्कार करुन ख्रिश्चन धर्माच्या कल्पनेहून निराळे " पृथ्वीवरील ईश्वराचे राज्य " आदर्श म्हणून आपल्यापुढे ठेवले आहे. ज्योतिबा राष्ट्र-वादी नव्हते. परंतु 'राष्ट्र' म्हणून संबोधन करताना त्यांच्या मताप्रमाणे "स्वातंत्र्य आणि समता यांच्यावर आधारलेला प्रादेशिक समाज" असा राष्ट्र याचा अर्थ होता. जातीजातीत व धर्माधर्मात निर्बद्ध झालेल्या समाजाची गाठोडी म्हणजे राष्ट्र नव्हे असे ते अनेक ठिकाणी सांग-तात. त्यांच्या मताने कोणताही प्रादेशिक समाज हा विश्व-समाजाचा एक घटक म्हणूनच राहिला पाहिजे. मानवांना धर्मसंस्थांनी एकमेकांपासून विभक्त व एकमेकांचे शत्रू बनवून, हिंदु, ख्रिश्चन, मुसलमान इत्यादी भेद पाडले आहेत, हे भेद भयानक धर्मकल्पनांवर आधारलेले आहेत, असे ते वारंवार सांगतात, धर्मग्रंथ हे ईश्वरप्रणीत किंवा ईश्वरी प्रेरणेने निर्माण केले आहेत. असे म्हणणाऱ्या धर्मसंस्थांचा त्यांनी निषेध केला. धर्मात जे जे काही सांगितलेले असते ते सत्य होय, ही अंधश्रद्धा नाहीशी झाली पाहिजे, असाही ते वारंवार इशारा देतात. जगातील सर्व धर्म हे गैरसमज व अंधश्रद्धेवर उभारले आहेत, यांच्यामध्ये जे जे काही सांगितले आहे ते सत्य आहे असे आपण म्हणता कामा नये, असे ते म्हणतात.

"निर्मिक म्हणजे ईश्वर" ज्योतिबांनी विश्व-निर्माणकर्त्यास 'निर्मिक' हा नवीन शब्द वापरला आहे. याचे कारण जगातील सर्व ईश्वरवाचक जे जे प्रचलित शब्द आहेत, त्या शब्दांच्या पाठीमागे आराधना, भक्ती किंवा पूजा करण्याचे एक निरनिराळे कर्मकांड आहे, ते सर्व कर्मकांड व्यर्थ व मानवांच्यामध्ये सामाजिक फूट पाडणारे आहे, असे त्यांचे मत आहे, म्हणून त्यांनी ईश्वर, अल्ला, गॉड, ब्रह्म, इत्यादी ईश्वरवाचक रूढ शब्द काढून टाकले. मानवांची सेवा किंवा मानवी समतेचे व स्वातंत्र्याचे रक्षण ही खरी ईश्वराची पूजा होय असे ते म्हणतात.

ज्योतिबांच्या निधनानंतर महाराष्ट्रातील सत्य-शोधक चळवळीचे रूपांतर ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादात झाले. त्यांना ज्योतिबांच्या बुद्धिवादाचा व विश्व-मानवतावादाचा स्पर्श झालेला नाही असे दिसते. सत्यशोधक चळवळीचा विपर्यास म्हणजे ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळ होय. हा विपर्यास कसा होता हे दाखविण्याची ही वेळ आहे. भारताला परकीय आक्रमणापेक्षा यादवीयुद्धाचा अधिक धोका आहे. नकारात्मक आंदोलन कायम राखल्यास हे यादवी युद्ध अधिक तीव्र स्वरूप धारण करील. यादवी युद्धाच्या आगमनाची चिन्हे दिसू लागली आहेत. ज्योतिबांनी सांगितलेले अर्धसत्यच या चळवळीमध्ये अजून प्रभाव गाजवीत आहे. यामध्ये ब्राह्मणप्रधान जातीयवाद जाऊन त्या ठिकाणी नवा जातिवाद उभा होण्याचा संभव आहे. ज्योतिबांनी सांगितलेले विचार जाति-भेदातीत व धर्मभेदातीत होते, हे लक्षात घेतले तरच








ज्योतिबांच्या सत्याचे संपूर्ण स्वरूप लक्षात आले असे होईल.

पृथ्वीवर देवाचे राज्य यावे याकरिता एखादा द्रष्टा एकदम प्रकट होतो, व तो एका मंगल सत्याचे बीज देऊन जातो. त्या सत्याचे ते संपूर्ण बीज रोवले तर त्यातून देवाचे राज्य पृथ्वीवर निर्माण होऊ शकते, परंतु असे कधी झाले नाही. कारण अनुयायी त्या सत्याचा अर्धाच भाग स्वीकारतात व नरकाचा धोका निर्माण होतो. अंतर्गत यादवी हा सामाजिक नरक होय.

गुलामगिरी किंवा सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक या दोन पुस्तकातील ज्योतिराव फुले यांची भारताच्या राजकीय धार्मिक व सामाजिक इतिहासांची उपपत्ती ही एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील युरोपियन व इंग्लिश इतिहासकारांनी लिहिलेल्या ग्रंथांच्या आधारे ज्योतिरावांनी सांगितली आहे हे त्यांच्या 'शेतकऱ्यांचा आसूड' या निबंधाच्या पायतळातील टिपण्यांवरून उघडकीस येते. इंग्रजी शिक्षण बेताबाताचे होते तरी ते इंग्लिश लिहू शकत होते व महत्त्वाचे उच्च दर्जाचे ग्रंथ समजून वाचू शकत होते ही गोष्टही यावरून निदर्शनास येते. अलीकडे गेल्या शंभर वर्षात प्राचीन भारतीय इतिहासाचे जे मौलिक संशोधन झाले आहे त्या संशोधनाने पूर्वीच्या संशोधकांचे बरेचसे निर्णय काही बाबतीत चुकीचे ठरले आहेत व काही बाबतीत अंशतः काल्पनिक ठरले आहेत. मत्स्यावतारापासून परशुराम अवतारापर्यंतच्या अवतारांचा ज्योतिरावांनी केलेला ऐतिहासिक अर्थ वामन व परशुराम वगळल्यास केवळ काल्पनिक आहे असे मानावे लागते. विशेषतः भारतीय विषम व ब्राह्मणप्रधान समाजरचनेस बाहेरून आलेले ऋग्वेदिक आर्य हे मूलतःच कारण होत या विधानाला आता विशेष पुष्टी मिळू शकत नाही. ऋग्वेदिक आर्य संख्येने अत्यल्प होते व कायम पगडा बसवतील इतके बलवानही नव्हते. विषम समाजरचनेची निर्मिती ही समाजाच्या आंतरिक सामाजिक शक्तींच्या आर्थिक व राजकीय बलाबलामुळे निर्माण होत असते व ती परिवर्तन पावत असते हा सामाजिक विकासाचा सिद्धान्त मान्य करावा लागतो.

आर्यपूर्व अवैदिक भारत हा विकसित अशा द्राविडी संस्कृतीने व्यापला होता व वर्तमान हिंदूधर्म त्याच संस्कृतीचा परिवर्तित आविष्कार आहे ही उपपत्ति आता सर्वमान्य झाली आहे. काही विद्यमान आधुनिक संस्कृतिशास्त्रज्ञ तर जातिभेद हा आर्यपूर्व संस्कृतीत भारताच्या दक्षिण प्रदेशाला बाढीस लागला व तो वैदिक आर्यांना स्वीकारावा लागला असेही म्हणू लागले आहेत. ज्योतिरावांनी गुलामगिरी या पुस्तकात दाखवलेल्या आर्यपूर्व ज्योतिबा, खंडोबा, म्हसोबा, बहिरोबा, बाणासूर इत्यादी देवता व त्यांचे पूजा-संप्रदाय हे आर्यपूर्व लोकांचे होते हे ज्योतिरावांनी स्वतःच सांगितले आहे. येथील द्राविडी संस्कृतीला आसुरी संस्कृती असे म्हणता येते ही गोष्ट ज्योतिरावांनीही सुचविली आहे व त्यात बरेच तथ्य आहे. त्यात संस्कृतीतील मोठा व मूळचा पुरोहितवर्ग हाच विद्यमान भारतातील बहुसंख्य ब्राह्मणवर्ग ही गोष्टही ज्योतिरावांना मान्य झाली असती असे सार्वजनिक सत्यधर्म पुस्तकाच्या (पृ. ३९७) टिपणीवरून लक्षात येते. येथील देशस्थ ब्राह्मण शूद्र व अतिशूद्र यांच्यापैकीच आर्यीकरण झालेले ब्राह्मण होत असे जे त्यांनी विधान केले आहे त्यावरून सूचित होते. सोवळ्या ओवळ्याच्या कल्पनेवर ज्योतिरावांनी कडाडून हल्ला केला आहे, व सोवळ्या-ओवळ्याची ही कल्पना आर्यांनी वर्चस्व प्रस्थापित करण्याकरिता आर्येतरांवर लादली व त्यांनी ती भुलून पत्करली असे जे ज्योतिरावांनी जागोजागी विधान केले आहे ते आधुनिक मानवजातिशास्त्रज्ञांना मान्य नाही. सोवळ्या-ओवळ्याची कल्पना प्राथमिक मानवसमाजांमध्ये जगात सर्वत्र होती व वर्तमान कालापर्यंत कमीजास्त प्रमाणात अद्ययावत् किंवा आधुनिक पश्चिमी समाज सोडल्यास सर्वत्र कमी-जास्त प्रमाणात आहे हे शास्त्रज्ञांच्या गेल्या दीडशे वर्षातील जागतिक संशोधनावरून सिद्ध होते. 'टाबू' ( Taboo ) आणि 'माना' ( Mana ) या मौलिक अशा मानवजातिशास्त्रज्ञांनी स्वीकार-






लेल्या कल्पना आहेत. त्या जादूटोणा व विविध धार्मिक रूढी यांचा अर्थ उमगण्यास उपयोगी पडतात. प्राथमिक व मध्ययुगीन सर्व मानव-समाजांच्या धार्मिक चालीरीती, मंत्रतंत्र, जादू-टोणा इत्यादी व्यवहारांचा अर्थ टाबू व माना या कल्पनांच्या साहाय्याने मानवजातिशास्त्रज्ञांना करता येतो. 'टाबू' म्हणजे निषिद्ध पापशक्ती व 'माना' म्हणजे विधायक पुण्यशक्ती होय. उदा. गोमांसभक्षण हे महापाप आहे, मृतांच्या नातेवाईकांना अस्पृश्य मानणे म्हणजे सुतक पाळणे, प्रेतांला अपवित्र मानणे, डुकराचे मांस निषिद्ध मानणे इत्यादी प्रकारच्या निषेधात्मक चालीरीती आर्य व आर्येतर या सर्वांच्याच मधे सापडतात. गोमांसभक्षण हे पाप आहे ही कल्पना मूळची आर्यांची नव्हे. ती आर्येतरांची आहे व ती कालांतराने आर्यांनी स्वीकारली ही कल्पना ज्योतिरावांनाही मान्य झाली असती. हे वैदिक आर्य गोमांसभक्षक होते असे त्यांनी वारंवार केलेल्या विधानांवरून स्पष्ट होते. मृतांच्या नातेवाईकांची अस्पृश्यता म्हणजे सुतक पाळण्याची चाल ही आर्येतरांपासून आर्यांनी स्वीकारली ही गोष्ट स्मृतींवरून अनुमानता येते. शूद्रांनी सुतक एक महिना पाळावे असे विधान स्मृतीत आढळते. स्मृतींमध्ये भक्ष्याभक्ष्य-विषयक किंवा स्पृश्यास्पृश्यविषयक सांगितलेल्या चालीरिती या परंपरागत असलेल्या त्या त्या जमातींच्या चालीरीती होत, नव्या कायद्याने निर्माण केलेल्या चालीरीती नव्हेत, ही गोष्ट स्मृतींच्या आधुनिक अभ्यासकांना नव्याने सांगण्याची गरज नाही.

बऱ्याचशा अनुयायांना व चाहत्यांना न मानव-णारे असे अनेक मौलिक विचार ज्योतिरावांनी मांडले आहेत. उदा. ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी व अन्य संतप्रणीत ग्रंथ हे शूद्र अतिशूद्रांना फसविण्या-करिता व ब्राह्मणांचे आधिपत्य दृढ करण्याकरिता निर्माण केलेले कारस्थान आहे असे ज्योतिराव अनेक ठिकाणी बजावतात. विष्णू व पंढरीचा विठ्ठल यांची ज्योतिरावांनी खूप थट्टा उडविली आहे हे महाराष्ट्रातील त्यांच्या चाहत्यांना व अनुयायांना कितपत पचले असेल याची वानवा आहे. हिंदुधर्मातील मूर्तिपूजा हे ब्राह्मणांनी पोट भरण्याकरिता काढलेले थोतांड आहे, तीर्थ-यात्रा, श्राद्ध इत्यादि विधी हा लुबाडूपणाचा धंदा आहे, एकेश्वरवादी ख्रिस्तीधर्म व मुसलमान धर्म हे हिंदुधर्मापेक्षा अधिक श्रेष्ठ धर्म आहेत, इत्यादी ज्योतिरावांची विधाने चाहत्यांनी व अनुयायांनी मनन करण्यासारखी आहेत. महंमदावर एक उत्कृष्ट प्रशंसापर कविता ज्योतिरावांनी लिहिली आहे. ती या संदर्भात वाचावी. ख्रिस्ती व मुसलमान लोकांनी येथील हिंदूंना बाटविण्याचे पूर्वी केलेले उद्योग ज्योतिरावांना स्वागतार्ह वाटतात. त्याबद्दलची पोटदुखी केवळ ऐतखाऊ, ब्राह्मणानाच बाधते, असे त्यांनी वारंवार म्हटले आहे. उदा. पंडिता रमाबाई यांनी ख्रिस्ती धर्म पत्करून ख्रिस्ती धर्मप्रसाराची ज्योतिबांनी प्रशंसा केली आहे, (सत्सार : पृ. २८६). मात्र याचा अर्थ असा नव्हे की हिंदूंनी मुसलमान वा ख्रिस्ती व्हावे असे ज्योतिरावांचे मत होते. पवित्र ग्रंथ-निष्ठ सर्वच धर्म हे मानवामानवात फूट पाडणारे असल्यामुळे अयोग्य होत असा त्यांचा अंतिम निर्णय होता. तुलनात्मक दृष्टीने विचार करता प्रचलित हिंदू धर्मापेक्षा मुसलमान धर्म वा ख्रिश्चन धर्म कैक पटींने श्रेष्ठ होत एवढेच त्यांना सांगावयाचे होते. खरा धर्म सर्व मानवांचा एकच आहे. सर्व धर्मनिष्ठ सामाजिक भेद हे मिथ्या भेद होत, असा त्यांनी काढलेला अंतिम निष्कर्ष होता.

हिंदुधर्मावरील विशेषतः ब्राह्मणप्रधान हिंदु-समाजरचनेवरील व ब्राह्मणप्रधान संस्कृतीवरील त्यांचा हल्ला एका तत्कालीन ऐतिहासिक विशिष्ट सामाजिक व राजकीय परिस्थितीची तीव्र प्रति-क्रिया होती व ती तीव्र प्रतिक्रिया तटस्थ रीतीने पाहणाऱ्या आधुनिक विचारवंतास मर्यादित अर्थाने समर्थनीयच वाटेल यात शंका नाही व ती समर्थनीय आहेच. अव्यवस्थित व बेजबाबदार उत्तर पेशवाईत व अव्वल इंग्रजीमध्ये ब्राह्मणांचे महाराष्ट्रात प्रस्थ वाढले व सामाजिक विषमतेची धार अधिक तीक्ष्ण झाली ही गोष्ट लोकहितवादी,



अनुक्रमणिका








म. गो. रानडे, आगरकर इत्यादी आधुनिक विचारवंतांना देखील खंत व उद्वेग उत्पन्न करणारी होती ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. उत्तरपेशवाईबद्दल लो. टिळकांचे असेच मत होते. लोकहितवादींची शतपत्रे या गोष्टीची साक्ष देते. ही शतपत्रे म्हणजे ब्राह्मणी विद्यांवर व ब्राह्मणी संस्कृतीवर उगारलेली बुद्धिवादी शतशस्त्रेच होत. ती अजूनपर्यंत गंजलेली नाहीत, त्यांचे तेज अजूनही तीक्ष्ण आहे. वर्तमान परंपरावादी विद्यापीठीय अनेक सुशिक्षितांना विशेषतः मराठी प्राध्यापकांना त्यांच्यापासून मिळणारा इशारा अजूनही लक्षात आलेला नाही. परंतु आता स्वातंत्र्योत्तर काळात ब्राह्मणेतर वाद हा जीर्ण झाला असून त्यातील अभिनिवेश जर कायम राहिला तर तो अधोगतीचे एक लक्षण ठरेल याची दखल आधुनिक लोकशाही शक्तींनी स्पष्टपणे घेतली पाहिजे. ज्या परंपरागत संस्कृतीवर ज्योतिरावांनी हल्ला केला त्या संस्कृतीचेच एक प्रत्यंतर म्हणजे लोकशाही भारतातील ब्राह्मणेतर वाद व जातिवाद होय. ज्योतिराव हे ब्राह्मण जमातींवर जितका कडाडून हल्ला करतात तितकेच उलट अंतरंगातून अत्यंत मऊ आहेत हेही त्यांच्या प्रत्यक्ष वर्तनावरून दिसून येते. ज्या ज्या ब्राह्मणांनी सहकार्य वा अल्पस्वल्प व मोठी मदत सत्यशोधक समाजास केली तिची पावती अत्यंत नम्रपणे व प्रेमळ बंधुत्वाने दिलेली आहे ही गोष्ट या म. फुले समग्र वाङ्मय संग्रहात अनेक ठिकाणी दिसून येईल. **त्यांचा हल्ला पद्धतीवर होता, विशिष्ट जातीतील माणसांवर नव्हता. हा विवेक त्यांचा हृदयात सतत जागृत होता.** हा विवेक त्यांच्या चाहत्यांमध्ये जर जागृत राहिला तर आगामी यादवी टाळण्याचे श्रेय पदरात पडू शकेल.

---














डॉ. जितेन्द्रनाथ वंदोपाध्याय : सारसंकलक–दुर्गा भागवत

# शिव व शैव (उत्तरार्ध)

## काश्मीरातली शिवभक्ति

दक्षिण भारतातली शिवभक्ती प्रांजळ व भोळी पण प्रगाढ आहे. काश्मीरातल्या शिवभक्तीचे स्वरुप याहून भिन्न आहे. दक्षिण भारतात वर उल्लेखिलेल्या शैव प्रचाराच्या काळी किंवा त्याहून जरा नंतर काश्मीरात शैव आचार्यांचा उदय झालेला आढळतो. हे आचार्य तत्त्वज्ञानाचा पुरस्कार करीत होते. परंतु त्यानी स्वीकारलेले शैव तत्त्वज्ञान व आचरण उग्रता व अतिमार्गी कला यांच्यापासून दूर होते. इसवी सनाच्या चौथ्या – पाचव्या शतकात काश्मीरातल्या हिमावगुंठित गिरिप्रदेशाच्या सीमेवर भागवत संप्रदायाचे काही आचार्य आपल्या धर्माचा प्रचार करीत होते. काही प्राचीन पांचरात्र ग्रंथही या ठिकाणी रचले गेले असे म्हणतात. काही शैव आचार्यही मध्ययुगाच्या प्रारंभी काश्मीर हेच आपल्या धर्मसंप्रदायाच्या प्रचाराचे केंद्र बनवले होते. त्यांच्यातले पहिले व प्रमुख आचार्य वसुगुप्त हे आहेत. इसवी सनाच्या नवव्या शतकात हे होऊन गेले. शिव श्रीकंठ याचे ते मंत्रशिष्य होते. शिव श्रीकंठ हा आगमशास्त्राचा प्रवर्तक. त्यानेच 'शिवसूत्र' रचले. महाभारताच्या नारायणीय पर्वात पाशुपतयोगाचा प्रवर्तक तोच उमापति भूतपति ब्रह्मदेवाचा पुत्र शिव श्रीकंठ. तो व वसुगुप्ताचा गुरु म्हणून प्रसिद्ध असलेला श्रीकंठ स्वतः शिवच होता हे अनुमान विसंगत दिसत नाही. कारण काश्मिरी शैव मताचा प्रवर्तक जो वसुगुप्त त्याला अद्भुत रीतीने शिवसूत्रातल्या रहस्याची प्राप्ती झाली हे प्रसिद्ध आहे. काश्मीरच्या शैव ग्रंथात शिवसूत्र श्रेष्ठ समजले जाते. कोणत्या रीतीने वसुगुप्ताला हे शिवसूत्र उपलब्ध झाले त्याच्याबद्दल विविध दंतकथा अस्तित्वात आहेत. एका दंतकथेनुसार महादेवपर्वतात शिवसूत्रावली त्याला कोरून काढलेली आढळली. कुणी म्हणतात की, कुणा सिद्धाच्या अनुग्रहाने ही सूत्रावली त्याला प्राप्त झाली. आणखी एक दंतकथा अशी की शिवाने किंवा अन्य कुणा सिद्धाने त्याला स्वप्नात ही सूत्रावली सांगितली. याशिवाय शैव मतावरचा दुसरा प्रमाणित ग्रंथ 'स्पंदकारिका' हा आहे. हा ग्रंथ वसुगुप्ताने रचला. त्याचा प्रमुख शिष्य कल्लट हा होय. कल्लट हा काश्मीरचा एक श्रेष्ठ राजा असून तो उत्पलवंशीय अवंतीवर्म्याचा समकालीन होता. हा काल इसवी सनाच्या नवव्या शतकातल्या उत्तरार्धाचा आहे. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकरांच्या मते वसुगुप्तच शिवसूत्राचा कर्ता आहे.

काश्मीरी शैवसंप्रदायाच्या दोन शाखा स्पंदशास्त्र व प्रत्यभिज्ञाशास्त्र या नावाने प्रसिद्ध आहेत. आचार्य वसुगुप्तानंतर बऱ्याच वर्षांनी, म्हणजे नवव्या शतकाच्या अखेरीस किंवा दहाव्या शतकाच्या प्रारंभी सोमानंद नावाचा त्यांचा एक शिष्य झाला. ज्याप्रमाणे कल्लटाने त्यांच्या तत्त्वांचा, उपदेशाचा व धर्मनीतीचा प्रचार केला त्याचप्रमाणे सोमानंदाने अद्वैतवादाचा प्रचार केला. प्रत्यभिज्ञा-शाखेचा प्रवर्तक तोच आहे. आपल्या मताच्या निरूपणासाठी त्याने 'शिवदृष्टि' नावाचा एक ग्रंथ लिहिला. परंतु त्याचा शिष्य उदयाकर यानेच त्याच्या धर्ममताचा प्रचार जारीने केला. त्याने सूत्रबद्ध काव्यात आपला ग्रंथ लिहिला. त्याचे नाव 'ईश्वर-प्रत्यभिज्ञा कारिका अथवा सूत्रावली' गुरुप्रणीत अद्वैतवादाची सांगड त्याने मोठ्या कौशल्याने अन्य वेगवेगळ्या धर्मतत्वांशी घातली. याचेच दुसरे नाव उत्पलाचार्य.

कल्लटाच्या नंतर त्याचा मामेभाऊ व शिष्य प्रद्युम्न भट्ट, त्याचा पुत्र व शिष्य प्रज्ञार्जुन, त्यांचा शिष्य महादेव भट्ट व त्याचा पुत्र व शिष्य श्रीकंठ भट्ट क्रमपरत्वे या संप्रदायाचे गुरु झाले. श्रीकंठ भट्टाचा शिष्य व दिवाकराचा मुलगा भास्कर हा बहुधा इसवी सनाच्या अकराव्या शतकातला असावा. वसुगुप्ताच्या 'उपदेशावली'वर त्याने 'शिवसूत्रवार्तिक' नावाचा ग्रंथ लिहिला. कल्लटापासून उदित झालेल्या गुरुपरंपरेतला भास्कर हा शेवटला आचार्य.

उदयाकर– उत्पलाचार्याचा मुलगा व शिष्य लक्ष्मण; लक्ष्मणाचा शिष्य अभिनवगुप्त. अभिनवगुप्ताचे संप्रदायातला गुरु म्हणून मिळालेले स्थान फार श्रेष्ठ आहे. अभिनवगुप्त अत्यंत प्रखर बुद्धीचे पंडित असून त्यांचे शास्त्रविषयक ज्ञान असाधारण होते. उत्पलाचार्यांचे ग्रंथ व 'परात्रिंशिका' तंत्रावर त्यानी विविध भाष्ये रचली.








त्यांच्या ग्रंथात 'तंत्रालोक' व 'तंत्रसार' या ग्रंथाची नावे विशेष विख्यात आहेत. अकराव्या शतकात काश्मीरात जो शैवधर्म विस्तारला त्याचे बरेचसे श्रेय याच आचार्यांना आहे. याच वेळी आणखी दोन विद्वान, उत्पल वैष्णव व रामकंठ यानी अनुक्रमे 'प्रदीपिका' ('स्पंदकारिके'चे भाष्य) व 'स्पंदविवृत्ति' नांवाचे शैवमतप्रवर्तक दोन ग्रंथ निर्माण केले. 'रामकंठ' उत्पलाचार्यांचाच एक शिष्य होता. आचार्य अभिनव गुप्तांचा शिष्य क्षेमराज होता. आपल्या गुरूने प्रवर्तित केलेले कार्य यथासांग तडीस नेण्याचा प्रयत्न त्याने केला. त्याने 'शिवसूत्रा'वर 'विमर्शिणी' नावाची एक टीका लिहिली. त्याचप्रमाणे 'स्वच्छंद' वगैरे तंत्रांवर त्याने भाष्ये लिहिली. त्याचा शिष्य योगराज याने अभिनवगुप्तांजवळही विद्या संपादन केली होती. त्याने अभिनवगुप्तांच्या 'परमार्थसार' या ग्रंथावर एक भाष्य लिहिले. या काश्मीरी शैव गुरूंच्या कार्याची धुरा बाराव्या शतकात जयरथ व अठराव्या शतकात शिवोपाध्याय वगैरे सांप्रदायिकांनी वाहिली.

काश्मीरी शैव संप्रदायाचे हे सारे आचार्य विद्या, बुद्धि, तत्त्वज्ञान, चिंतन यात असामान्यपणे पारंगत होते. त्यानी पुढील पिढ्यांना जो ठेवा ठेवलेला आहे त्याचे अवलोकन करून भारतीय व परकीय तत्त्वज्ञानी पंडितांनाही त्यांच्यापासून श्रद्धा व स्फूर्ती सतत लाभत आलेली आहे. काश्मीरच्या दोन शैव शाखांचा उल्लेख मागे आलेलाच आहे. त्यांचे थोडे वेगवेगळे निरूपण करणे प्राप्त आहे. ज्या शाखेचा संस्थापक वसुगुप्त व त्याचा शिष्य कल्लट प्रचारक होता, ती शाखा 'स्पंदशास्त्रा'ची. या शाखेचे तत्त्वज्ञानीय स्वरूप असे. या शास्त्राप्रमाणे विश्वरचना करण्यासाठी ईश्वराला कोणत्याही गौण कारणावर विसंबून रहावे लागत नाही. दुसऱ्या काही धर्ममतानुसार कर्म व प्रधान (उपादानीभूत कारण) गौण कारण व ईश्वराच्या सृजनकार्यात या कर्म व प्रधानाचा सक्रीय अंशमात्र हातभार लागतो. पण हे शास्त्र या मताचा स्वीकार करीत नाही. शंकराचार्यांनी मांडलेल्या मायावादाप्रमाणे जग हे मिथ्या आहे असेही हे शास्त्र मानीत नाही. या संप्रदायाच्या मते ईश्वर हा संपूर्ण स्वाधीन (स्वतंत्र) व निरपेक्ष आहे; तो आपल्या अत्यंत श्रेष्ठ अशा इच्छेनुसार सृष्टि निर्माण करतो. सृष्ट जग हे त्याचेच प्रतिबिंब आहे; आणि म्हणून आपाततः ईश्वर व सृष्टि यांचे जे भिन्नपण आढळते ते भ्रांतिमूलक आहे. जीव व जग यांच्यात कोणताही भेद नाही. आरशात अनेक गोष्टींचे प्रतिबिंब दिसले तरी त्याने जसा आरशावर काही परिणाम होत नाही, तसाच समग्र विश्वाच्या पसाऱ्याचे प्रतिबिंब ईश्वरात आढळले तरी ईश्वरावर त्याचा कुठलाच परिणाम होत नाही; ईश्वराला प्रपंचाची बाधा होत नाही. या धर्ममतात ईश्वराला उपादानीभूत कारण म्हटलेले आहे. याहून भिन्न मत असे आहे की ईश्वर सृष्टिरचनेचा विषयच म्हणजे उपादान कारण मूळ वस्तू असूनही तो तिच्या बाहेर असतो; हे मत स्पंदशास्त्रमतवाद्यांना मान्य नाही. वसुगुप्ताचे मत असे की महादेव अत्यंत कुशल अशा जादुगाराप्रमाणे, पट, रंग, कुंचला वगैरे चित्रकारीचे साहित्य अगर उपादान न वापरताच आपले विश्वप्रपंचाचे चित्र रेखाटतो. आणखी एका सुंदर उपमेच्या आधारे त्यानी ईश्वरनिरपेक्ष भावाने सृष्टी कशी निर्माण करतो ते सांगितले आहे. सिद्ध योगी जेव्हा कुठलेही उपादान न वापरता केवळ आपल्या एकाग्र इच्छाशक्तीच्या बळावर नानाविध वस्तू सादर करू शकतो त्याचप्रमाणे शिवदेखील आपल्या अत्यद्भुत इच्छाशक्तीच्या योगाने कोणाचे व कसलेही साहाय्य न घेता चराचर विश्व निर्माण करतो. काश्मीरी शैवमतात ज्या प्रकारे स्पंद व प्रत्यभिज्ञाशास्त्र यांचे निरूपण केले गेले आहे, त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते; ती अशी की हे शैवमत संपूर्णपणे अद्वैतवादाचाच पुरस्कार करते आहे. परंतु स्पंद व प्रत्यभिज्ञा या मतांची प्रतिष्ठापना होण्याच्या अगोदर जो आगमशास्त्रसंमत शैवधर्म उत्तर व दक्षिण भारतात प्रचलित होता त्यावर द्वैत किंवा बहुत्ववादाचाच प्रभाव पडलेला दिसतो. पाशुपतसंप्रदायातले अंतर्गत तत्त्व असेच द्वैतवादी आहे, हे आपण मागे पाहिलेच आहे. पूर्वी प्रतिष्ठित असलेल्या द्वैतवादाचे खंडन करण्याच्या हेतूने वसुगुप्त, कल्लट, सोमानंद वगैरे आचार्यांनी 'त्रिक' तत्त्वज्ञानाचे समर्थन व प्रचार केला. 'त्रिक' या शब्दात 'शिव, शक्ति व अणू, या तिघांचा समावेश होतो. याचा दुसरा अर्थ पशु, पाश व पति, असाही लावला जातो. या दुसऱ्या अर्थाचाच विचार या ठिकाणी आपल्याला करायचा आहे. पशु, पाश व पति







ही तीन तत्वे जरी निरनिराळी भासली तरी ती वस्तुतः एकच आहेत कारण पतीशिवाय पशु व पाश दोन्ही निर्बल ठरतात. परमेश्वर स्वतःच्या अत्यद्भुत सामर्थ्याने स्वतःच अगणित पशू अथवा जीवांच्या आकारे प्रकट होतो. त्याच्याच शक्तीमुळे सारा जीवसमूह निद्रा किंवा जागृती या दोन अवस्थात असतो. सुप्त अवस्थेत जीव मलीन होतो. मळ तीन प्रकारचा आहे; आणव, मायीय व कार्म. अविद्येच्या प्रभावामुळे जेव्हा स्वतःचे स्वांतत्र्य व आपली विश्वात्मक प्रकृती यांच्याबद्दल अज्ञानात राहातो; देहात्मभावामुळे मूढ होऊन ती शरीरालाच आपली स्थायी सत्ता किंवा स्थिती मानतो; त्याचप्रमाणे दुसरेही संकुचित भाव निर्माण होऊन तो बंधनात अड-कून पडतो; अशा वेळी तो आणव मळाने मळलेला असतो. जीवाची देहबद्ध अवस्था जेव्हा ईश्वराने निर्माण केलेल्या मायेवर अवलंबून असते तेव्हा तो जीव मायिक मळाने भरलेला असतो. जेव्हा देहस्थ ज्ञान आणि कर्मे-द्रिये यांच्यामुळे प्रभावित होऊन जीव नाना प्रकारची कर्मे आचरतो त्यावेळी तो कार्म मळाने कलुषित होतो. हे तीन प्रकारचे मळ शिवाच्या नादात्मक शाश्वत शक्तीच्या योगे उत्पन्न होतात. नादापासून शब्दाचीही निर्मिती होते; आणि शब्दाशिवाय जीवाच्या प्रापंचिक जीवनाला आकार येत नाही. हे तीन मळ, नाद एकत्र झाले की त्रिकाचे दुसरे तत्त्व म्हणजे पाश, ते होते असे समजावे. या पाशात बद्ध होऊनच पशु सुप्तावस्थेतल्या अज्ञानात जातो. हा पाश त्याला तोडता येतो परंतु त्यासाठी परिश्रम व सद्गुरूचा उपदेश आवश्यक आहे. एकाग्र व तीव्र मननाची शक्ती हा त्याचा उद्योगाचा मार्ग आहे. मननशक्ती-मुळे जीवाला शाश्वत सत्य प्रतीत होते. तो सर्वदा मळा-पासून मुक्त होतो व परमात्मस्वरूपी विलीन होतो. आत्यंतिक दीर्घ परिश्रमामुळे जीवात्मा व परमात्मा यांचा जो चिर संयोग होतो त्याला भैरव असे नाव शिवसूत्राच्या पाचव्या सूत्रात व त्यावरच्या भाष्यात दिलेले आहे.

प्रत्यभिज्ञाशास्त्राचा प्रवर्तक सोमानंद याचा 'शिव-दृष्टि' हा ग्रंथ या शास्त्राचा पाया होय. परंतु त्याचा शिष्य उत्पलाचार्य ऊर्फ उदयाकर याने ईश्वर-प्रत्यभिज्ञा कारिका या आपल्या ग्रंथात या मताचे निरूपण केले आहे. विश्व व सृष्टि यांचे विवरण त्याचप्रमाणे जीव व ईश्वर यांचा परस्परसंबंध यांच्याबद्दल स्पंदशास्त्रकार व प्रत्यभिज्ञाशास्त्रकार यांच्यात मतभेद नाही. परंतु प्रत्य-भिज्ञाशास्त्रकार ईश्वर व जीव यांच्या ऐक्याबद्दल थोडी वेगळी भूमिका घेतात. प्रत्यभिज्ञा दर्शनात जीवाचे शिवाशी ऐक्य, स्वतःमध्ये ईश्वर आहे याची ओळख पटली की होते. कठ श्वेताश्वतर व मुंडकोपनिषदात पुढील श्लोक आढळतो :

न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं
नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।
तमेव भान्तमनु भाति सर्वं
तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥

( कठ उप. ५, १५; श्वेताश्वतर ६, १८; मुंडक, २, २, १० )

या श्लोकाच्या प्रमाणे जीवाची ज्ञानशक्ति खरे पाहाता ईश्वराच्या शक्तीसारखीच असूनही तो सर्व प्रकाशमान करणाऱ्या परमेश्वराच्या शक्तीवर सर्व काही सोपवून मोकळा होतो. कारण सूर्य, चंद्र, तारे, वीज, अग्नि वगैरे सर्व प्राकृतिक शक्ती ईश्वराच्या प्रकाशानेच उजळलेल्या आहेत. ज्ञान व क्रियाशक्ति असलेला जीव ईश्वरी अंशाचा अधिकार असून वास्तविक ईश्वर व जीव यात कुठलाच वेगळेपणा नाही. परंतु जीव प्रथमपासूनच अज्ञानरूपी तमाने वेढलेला असल्यामुळे त्याला ईश्वराशी ऐक्य साधता येत नाही. या विषयीचे निरूपण करताना काश्मीरी शास्त्र-कारानी फार सुंदर उपमा योजली आहे. एका अपरि-चित तरुणाच्या रूपाचे व गुणाचे वर्णन ऐकून एक युवती त्याच्यावर जीवेभावे प्रेम करू शकते. परंतु युवकाचा पूर्वपरिचय नसल्याने त्याच्या जवळ नेल्या-वर तो तिला इतरांसारखाच सामान्य वाटतो. तिच्या मनाला प्रियमीलनाचा आनंद जराही होत नाही. परंतु त्याचा परिचय कुणातरी मार्फत जेव्हा खरोखरच घडून येतो तेव्हा हाच तो पुरुष, याच्यावरच मी प्रेम करते असे तिला उमगते व तिच्या आनंदाला सीमा राहात नाही. तसेच अज्ञानामुळे जीव जरी शिवाला आपली श्रद्धा अर्पण करीत असला तरी शिवाचे ज्ञान झाल्याशिवाय त्याला आपल्या तादात्म्याची जाणीव होत नाही. स्पंदशास्त्रान्वये गाढ चिंतन व सर्व प्रकारच्या मलापासून मुक्तता हे ईश्वरप्राप्तीचे साधन आहे; आणि या साधनामुळे भैरवाच्या रूपात हे ऐक्य प्रस्था-












पित होते. प्रत्यभिज्ञाशास्त्रकारांच्या मते आपण ईश्वराशी एकरूप आहोत याचे ज्ञान झाल्यावर पाशातून सुटका होते.

काश्मीरच्या शैवमताबद्दल अधिक विस्तृत चर्चा श्री. जगदीशचंद्र चटर्जी यांचा Kashmir Shaivism या ग्रंथात आढळतो.

काश्मीरातल्या शैव आचार्यांबद्दल फिरून सांगायचे ते हे की त्यांच्या धर्मचर्येत पाशुपत, कापालिक वगैरे उग्रपंथी लोकांचे अतिमार्गी प्रयोग नव्हते; त्याचप्रमाणे त्यानी प्राणायामादिकांवरही भर दिला नाही.

काहींचे असे मत आहे की काश्मीरी शैवमत द्राविड शैवसिद्धांताचा उगम आहे. हे मत दक्षिण भारतात अकराव्या शतकापासून शिरले. चौदाव्या शतकात दक्षिण भारतातल्या काही लेखात काश्मीरच्या शैव संप्रदायाचा उल्लेख आढळतो हे खरे. या दोन्ही धर्ममतात बरेच सादृश्य असले तरी वैधर्म्यही आहे. दक्षिण भारतात शैव मत अकराव्या शतकाच्या अगोदरपासूनच रूढ होते; तेव्हा काश्मीरी शैवसंप्रदायापासून ते निघाले हे म्हणणे बरोबर नाही. अकराव्या–बाराव्या शतकात मुसलमानांचे आक्रमण झाल्यावर अनेक शैव ब्राह्मण काश्मीरातून दक्षिण भारतात आले व तिथे त्यानी आपल्या धर्माचा प्रचार केला.

## आगमोक्त शैव धर्म

शिव व शैव यांसंबंधी आतापर्यंत आपण दक्षिण भारतातल्या शैवसंप्रदायाची व सर्वात उत्तरेकडच्या काश्मीर प्रदेशातल्या शैवसंप्रदायाची चर्चा केली. आता आपल्याला आगमोक्त, शुद्ध व वीरशैव या शैवसंप्रदायांची चर्चा करायची आहे. ती करण्यापूर्वी आपण मागे जी चर्चा केली तिच्या अनुषंगात एक गोष्ट लक्षात ठेवायला हवी की प्रथम जे लोक देशी भाषांत, म्हणजेच मातृभाषांत शिवभक्तीचा प्रचार जसा त्या त्या भाषेतल्या गीतिकाव्यांच्या द्वारा करते झाले, तेच नंतर शैवकथा व तत्वज्ञानाच्या विचारधारेच्या द्वारा ईश्वरप्रेमाच्या बरोबरच अद्वैतमताची प्रतिष्ठापना करण्यासाठी झटू लागले. दक्षिण व उत्तर भारतातल्या दोन्ही विशिष्ट मताच्या शिवोपासक मंडळींनी भाविकालासाठी जे साहित्य आणि तात्त्विक विचारांचा ठेवा ठेवून गेली आहे, ते साहित्य व ते चिंतन पाहिले की आजही विस्मय वाटल्यावाचून राहात नाही.

आता आपण ज्या शैवसंप्रदायांचा विचार करणार आहोत, त्यांचा उदय प्रामुख्याने दक्षिणेतच झालेला आहे. त्याचप्रमाणे अतिरेकाच्या दोषापासून मुक्त होऊन स्वतःच्या पंथाप्रमाणे शैवमताचा प्रचार व ऐकान्तिक शिवभक्तीचा प्रसार विशेष प्रमाणात इथेच झाला. नालायिर ( दिव्य ) या ग्रंथरचनेचे कर्ते जे आडवार ( आळवार ) लोक याना अग्रभागी लेखून दक्षिणेच्या वैष्णव आचार्यांनी ज्याप्रमाणे वैष्णव धर्ममत व तत्त्वज्ञान यांची प्रतिष्ठापना केली त्याचप्रमाणे तिथल्या तिथल्या शैव आचार्यांनी नायनार व इतर शिवभक्तांच्या स्तोत्ररत्नावलीना अग्रस्थान देऊन आपले सांप्रदायिक मत प्रगट केले. दोन्ही बाबतीतही प्रथम सरळ, ऐकांतिक ईश्वरभक्तीचा आविष्कार व नंतर तत्वज्ञानाधिष्ठित मताचा प्रचार करण्याची प्रवृत्ती दिसून येते.

याच्या अगोदर सन्तान – आचार्यांचा उल्लेख आलेलाच आहे. या आचार्यांपैकी पहिले आचार्य चार होते. त्यांची नावे मे कंड देवर, अरुडनन्दी, मरइ ज्ञान संबंधर व उमापति अशी होती. हे इसवी सनाच्या १२२३ ते १३१३ या कालावधीत होऊन गेले. त्यानी शैव सिद्धांत मताचा प्रचार केला. चौदा सिद्धांतशास्त्रांपैकी बहुतेक त्यानीच रचलेली आहेत. बारा कारिकांचा 'शिवनाथबोध' नावाचा शैव ग्रंथ संस्कृत असून रौरवागमाचा तो एक भाग आहे. मे कंडदेवरानी या ग्रंथाचा प्रमाणित अनुवाद तामिळमध्ये केला आहे. त्यांचा प्रख्यात शिष्य अरुड् नंदी याने 'शिवसिद्धि' नावाचा ग्रंथ लिहिला. मे कंड व मरइ ज्ञान हे दोघे जातीने शूद्र होते परंतु मरइ ज्ञान यांचा शिष्य उमापति ब्राह्मण होता. उमापतीची शिवभक्ती इतकी प्रखर होती की त्यानी शूद्र गुरूचे उच्छिष्टही प्रसाद म्हणून खायला मागे पुढे पाहिले नाही.

संतान आचार्यांत सर्वापेक्षा सिद्धांतशास्त्राची संख्या त्यांचीच मोठी असून त्यांचा प्रसारही अधिक प्रमाणावर झाला. त्यानी आठ ग्रंथ लिहिले. माणिक्य वासग (ह) र प्रणीत 'तिरुवासगय स्तोत्रावली'त ते तत्त्वज्ञान गीति छंदोबद्ध झालेले आढळते, तेच सर्वात










परम गंभीर शैव तत्वदर्शन आहे असे सर्व सिद्धांत-शास्त्रात विविध प्रकारे दाखवलेले आहे. यावरून असे दिसून येते की रामानुज, यामुनाचार्य वगैरेंनी वैष्णव धर्माचा जो प्रचार व प्रसार केला त्यानंतर शैव धर्माला परिपूर्णावस्था प्राप्त झाली असावी; कारण याच्यावर वैष्णव धर्माचा थोडा बहुत प्रभाव पडला असणे असंभवनीय नाही. या नंतरच्या काळात शंभुदेव व श्रीकंठ शिवाचार्य यांनी जे शुद्ध शैव मत प्रतिपादिले त्याच्यावर विशिष्टाद्वैतमताचा पूर्ण प्रभाव पडलेला स्वच्छ दिसून येतो. वर उल्लेखिलेल्या चार संतान आचार्यांच्या अगोदरच्या काळांतही कुठल्याना कुठल्या तरी रूपात शैव मत प्रचारात होते अशी चिन्हे आढळून येतात. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर म्हणतात की शिवकांचीच्या राजसिंहेश्वर या शिवमंदिरातल्या एका शिलालेखांत राजसिंह अत्यंतकाम हा शैव सिद्धांत दर्शनात पारंगत झालेला होता असा पुरावा आढळतो. हा राजसिंह अत्यंकाम इसवी सनाच्या सहाव्या शतकातल्या पराजित झालेल्या चालुक्य राज पुलकेशीचा समकालीन पल्लव राजा होता.

प्राचीन शैव धर्ममताचा मूलाधार आगमशास्त्र होय. आगमशास्त्रांची संख्या अठ्ठावीस होती असे मानले जाते. आगमांत शैव ग्रंथात असे आढळते की गोदावरीच्या काठी मंत्रकाली या स्थानी शैव आचार्य वंशपरंपरेने राहात असत. मंत्रकालेश्वर शिवमंदिर हे शैव केंद्र होते आणि तिथे आमर्दक इत्यादि चार मुख्य शैव मठ होते. आमर्दक हा त्या काळचा अत्यंत विख्यात शैव मठ होता; त्याच्या बऱ्याच शाखा भारतात अनेक ठिकाणी विखुरलेल्या होत्या. पराक्रमी चोल राजा राजेन्द्र गंगातीरावरील प्रदेश जिंकण्याच्या मोहिमेत असताना वर उल्लेखिलेल्या शैव आचार्यांच्या सांनिध्यात आला होता. आपली स्वारी संपल्यावर त्यांच्यापैकी काही जणाना बरोबर घेऊन स्वदेशी परतला. त्याच्या राज्यात नवागत आचार्य शैव धर्मीय अनेक ग्रंथ बरोबर घेऊनच आले. त्यामुळेच दक्षिण भारतात शैव धर्माचा पुष्कळ प्रसार झाला. या आचार्यांचा एक वंशज अघोर शिवाचार्य इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या मध्यावर होऊन गेला. त्याने 'क्रियाकर्मद्योतिनी' नावाचा शैव दर्शनाचा अत्यंत प्रमाणभूत गणला गेलेला ग्रंथ लिहिला. त्याच्यानंतर त्रिलोचन शिवाचार्य याने 'सिद्धांतसारावली' व वामदेव शिवाचार्याचा मुलगा निगम ज्ञानदेव याने 'जीर्णोद्धारशतकम्' नावाचे ग्रंथ लिहिले. तंजावरच्या सुप्रसिद्ध बृहदीश्वर या मंदिराच्या निर्मात्या चोल राजाने सर्वशिव पंडित शिवाचार्याला त्या मंदिराचा पुरोहित नेमले. त्या बरोबरच त्याने असा आदेश केला की जे आप, मध्य व गौड या देशातल्याच शैव गुरूंचे जे शिष्य – प्रशिष्य असतील त्यांनाच हे पद पुढे प्राप्त होत राहावे. यावरून असे दिसून येते की सर्वशिव पंडित शिवाचार्य हा उत्तर भारतातलाच असावा व आगमोक्त शैव मताच्या प्रतिष्ठापनेत द्राविडेतर आचार्यांनी एक महत्त्वाचा वाटा उचलला.

आगमवादी शैवजन वेद व उपनिषदे यांच्यावर श्रद्धा बाळगणाऱ्या वेदांती शैव मतापासून वेगळे होते. ते वेदादिक ग्रंथाना फार महत्त्व द्यायला तयार नव्हते. 'यस्य निश्वसितं वेदाः' ज्याच्या (ब्रह्मदेवाच्या) निश्वासातून वेद निघाले,' या वाक्यावर अर्थ आगमवादी शैव जन असे भाष्य करीत की महादेवाच्या मुखातून अठ्ठावीस आगमशास्त्रे निघाली असून ब्रह्मयाच्या केवळ निश्वासातून निघालेल्या वेदांपेक्षा अधिक पवित्र व महत्त्वाची आहेत. महादेव पंचमुखी असून त्याच्या पांच मुखांची नावे सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान अशी आहेत. या पाच तोंडातून आगमशास्त्रे बाहेर पडली. सद्योजात मुखातून कामिकागम वगैरे पाच आगम, वामदेव मुखातून सुप्रभागम वगैरे पाच आगम, अघोर मुखातून विजयागम वगैरे पाच आगम, तत्पुरुष मुखातून रौरवागम वगैरे पाच आगम, व ईशान मुखातून किरणागम, वातूलागम वगैरे बाकीचे आगम निघाले. शिवमुखातून हे आगम निघाले अशी दंतकथा असली तरी बहुतेक आगम इसवी सनाच्या नवव्या शतकात लिहिले गेले. हे ग्रंथ बहुतेक दक्षिण भारतात लिहिले गेले याचा आणखी एक पुरावा असा की नागरी लिपीत पण तामीळ, तेलुगु व कन्नड या भाषात लिहिले गेले. बरेचसे आगम ग्रंथ पांचरात्र संहितेप्रमाणे अजूनही अप्रकाशित आहेत. दक्षिण भारतातला आगमवादी शैव वर्ग अद्वैतवादी व वेदाचारी मीमांसकांना पाशबद्ध पशू असे संबोधून त्यांची निंदा करीत. शैव धर्माची दीक्षा घेण्यास ते अपात्र आहेत असे मानीत. उलटपक्षी कुमारिल भट्ट








वगैरे प्रमुख मीमांसक व अद्वैतवादीयांना नास्तिक व अति नीच श्रेणीचे कुमार्गगामी ब्राह्मण एवढेच काय पण ते शूद्र आहेत असे म्हणायला देखील मागेपुढे पाहात नसत. याप्रमाणे त्यांच्यात हा शाब्दिक विरोध आढळत असला तरीदेखील कुठे कुठे त्यांची मते एकाच तऱ्हेची आहेत व त्यांनी एकमेकांपासून काही गोष्टी उचललेल्या आहेत हेही दिसून आल्यावाचून राहात नाही. आगम संप्रदायी शैवजन आपल्या धर्मानुष्ठानात गृह्यसूत्रात वर्णिलेले कित्येक होम करीत व तेच मंत्रही वापरीत. त्यांचे कित्येक मंत्र वैदिक मंत्रांच्या अनुकरणातूनच निघालेले आहेत. परंतु त्यांच्या पूजाविधीतला सर्वात पवित्र पंचाक्षरी मंत्र 'नमःशिवाय' हा आहे. त्याचप्रमाणे त्यांचा दीक्षाविधी, अंकुरार्पण नावाची दीक्षादानातली प्रारंभीची क्रिया या गोष्टी मात्र वैदिक क्रियाकर्मांहून भिन्न आहेत. शैवदीक्षाविधीबद्दल थोडेसे विवेचन पुढे येईलच.

मोक्षाची आकांक्षा बाळगणारे आगमवादी शैव सद्गुरूपासूनच दीक्षा घ्यायची हा नियम पाळीत. जो कोणी गुरूकडून दीक्षा घेणार नाही त्याच्या धर्माचरणात न्यून हे राहाणारच असा त्यांचा समज होता. गुरूविना मोक्षप्राप्ती नाही अशी त्यांची श्रद्धा होती. गुरू हा साक्षात् शिव आहे अशी त्यांची श्रद्धा असल्यामुळे दीक्षाविधीत गुरूचे स्थान फारच महत्त्वाचे असे. मुख्यत्वेकरून संसाराचा त्याग करणाऱ्या लोकांनाच दीक्षा घेण्यास पात्र समजले जाई. दीक्षा घेणारा भक्तिभावाने भरलेला असून दीक्षाग्रहणाची पात्रता येण्यासाठी त्याला देवीचा कृपाप्रसाद संपादन करावा लागे. दीक्षाग्रहणेच्छूवर हा जो अनुग्रह होई त्याला 'शक्तिपात' म्हणत. दीक्षा घेऊ इच्छिणारे लोक आपापल्या शक्तीचे अनुसरण करीत; त्यांना विविध प्रकारे शक्तिपाताचा प्रत्यय येई. देवीचा हा अनुग्रह कुणाला तात्रडतोब तर कुणाला उशीरा प्राप्त होई. शक्तिपाताच्या सुद्धा खालच्या व वरच्या अशा पायऱ्या आहेत. शैव दीक्षा भिन्न असून त्यांची नावे समय-दीक्षा, विशेष-दीक्षा, व निर्वाण-दीक्षा अशी आहेत. या दीक्षात वैविध्य आहे हे खरेच; परंतु तरीही या दीक्षांची वर्णने वाचली तर त्यात अतिमार्गिकतेचा दोष कुठेही आढळून येत नाही. पाशुपत विधीत जो उग्र, भयंकर भाग असे, तसा या दीक्षात आढळत नाही. समय व विशेष या दीक्षात गुरूच्या स्थानाला विशेषच प्राधान्य असून गुरु अधिक क्रियाशील असे. निर्वाण-दीक्षित शिष्यावरच सारा भार असे. हे शिष्य पूर्वीपासूनच अध्यात्मात प्रगत झालेले असत. समयदीक्षित गुरूच्या अनुष्ठानातून निघालेल्या विविध प्रक्रियांमुळे शिष्य पाशमुक्त होत असे. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या सर्व शिष्यांना दीक्षेनंतर नवी नावे प्राप्त होत असत. या बाबतीत लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की स्त्री व शूद्र याना दीक्षेच्या बाबतीत कुठलीच आडकाठी नव्हती. नव्याने दीक्षा घेतलेले शिष्य जर ब्राह्मण व क्षत्रिय असले तर त्यांच्या नावापुढे शीव (ब्राह्मण) ईशान देव (क्षत्रिय) अशा उपाधी लावल्या जात. वैश्य व शूद्रांना ईशान व गण अशा उपाधी लावल्या जात. ब्राह्मणीला ईशा व शिवशक्ती, क्षत्रियाणीला ईशा व देवशक्ती, वैश्या व शूद्रा याना अनुक्रमे ईशा व गणशक्ती अशी बिरुदे लावीत.

गुरू शिष्याला समयाचार शिकवीत. या शिष्यांना, शिव शैवशास्त्र, शिवाग्नि यांची उपासना करावी लागे व गुरुनिंदेपासून पराङ्मुख व्हावे लागे, मृत्युकालापर्यंत त्यांना गुरु व शिवाग्नीची पूजा करणे हे त्यांचे नित्य कर्म असे. विशेष प्रकारच्या दीक्षेचा लाभ झालेल्यांना पुत्रक असे म्हणत; या पुत्रकांना मृत्यूनंतर ईश्वरपदाची प्राप्ती होत असे. पुत्रक व समयी या दोन वर्गात भेद असे. पुत्रकाना आचार व अंतःस्थ क्रियाकर्मे करण्याचा उच्च अधिकार प्राप्त होत असे. समयी सर्वसाधारणपणे दासवृत्तीचे असत. पुत्रकांना देवपूजेचे अनुष्ठान करण्याचा अधिकार असे. समयींना मात्र पुष्प, पत्र, माला व मंदिरातली इतर सेवाकर्मे करावी लागत. परंतु निर्वाण-दीक्षा घेतलेले शैव सर्वात उच्च समजले जात. ते जीवन्मुक्त असत. ते सर्वज्ञ, पूर्णकाम असून अनादि ज्ञान, अपराशक्ती, पूर्णस्वातंत्र्य वगैरे दैवी सामर्थ्य असलेले असत.

शैव तत्त्वात चार पाद आहेत. पहिले दोन पाद क्रिया व चर्या नावाचे आहेत. उरलेल्या दोन पादांची नावे विद्या अगर ज्ञान व योग अशी आहेत. तामिळ शैव ग्रंथात या चार पादांची नावे अनुक्रमे सारियेइ (चर्या), किरिकेई (क्रिया), योकम् (योग) व ज्ञानम् (ज्ञान) अशी आहेत. ज्ञानपादातच शैव तत्त्वांचे मर्म आढळून येते. हे ज्ञान प्राप्त झाले

की शिष्य परम गुरु व इष्ट दैवत शिव यांच्याशी एकरूप होण्यास अधिकारी होतो. आगमोक्त शैवमतात काश्मीरी शैवमताप्रमाणेच तीन तत्त्वत्रयी सांगितलेली आढळते. ही त्रयी पति, पशु व पाश ही होय. काश्मीरी शैवमतात तिही पैकी दोन तत्त्वे, पशू व पाश ही सर्वस्वी पति अथवा ईश्वरावर अवलंबून असतात; परंतु शैवागमात पति अथवा शिव हाच काही प्रमाणात पशु अथवा जीव याच्या कर्माच्या द्वारा प्रभावित झाल्यामुळेच सृष्टिकार्य करायला प्रवृत्त होतो.

तैत्तिरीय आरण्यकाच्या दशम खंडात त्रेचाळीस ते सत्तेचाळीस या अनुवाकात पाच मंत्र दिले आहेत. या मंत्रात ईश्वराची पंचशक्ती व त्याची पंचकृत्ये ( सृष्टि, स्थिति, संहार, अनुग्रह व तिरोभाव ) वर्णन केलेली आहेत. मंत्रावली, मंत्रेश्वर, महेश्वर व मुक्तजीव हे चार पदार्थ म्हणजेच महादेवाची चार वैशिष्ट्ये आहेत.

पशु, जीव अथवा जीवात्मा क्षेत्रज्ञ म्हणूनही प्रसिद्ध आहे. तो नित्य व सर्वव्यापी आहे. शैवमताप्रमाणे मुक्त जीव आध्यात्मिक उन्नतीच्या सर्वोच्च स्तरावर असून तो अनेक अंशानी परमेश्वर शिवाशी सारूप्य पावलेला असतो. ही उन्नत दशा प्राप्त होण्यासाठी जीवाला अंतर्वर्ती म्हणजे त्याच्या आतले व खालचे सारे स्तर ओलांडावे लागतात. शैवदर्शनात स्तरसमूहाचे वर्णन विशेष रीतीने केलेले आढळते. पशु अथवा जीव यांचे तीन प्रकार असतात; विज्ञानाकल, प्रलयाकल व सकल. पहिला म्हणजे विज्ञानकल जीव हा सर्वोच्च स्तरावरचा जीव. ज्ञानार्जन, ध्यान व तप सत्क्रियांच्या द्वारा त्याचा कर्मक्षय होतो व त्याचे फळ म्हणजे तो कलांपासून मुक्त होतो. फक्त आणव मल काय तो त्याच्यापाशी राहिलेला असतो. दुसरा म्हणजे प्रलयाकल असा जो जीव त्याला विश्वप्रलयाच्या वेळी कलामुक्ति त्याच्या ठिकाणी कर्मामुळे उत्पन्न झालेला मल व आणव मल शिल्लक राहातो. तिसरा जो सकल जीव असतो त्याची कलाबंधनातून मुक्ती होत नाही. त्याच्या शरीरात आणव, कार्म व मायीय असे तिन्ही प्रकारचे मल शिल्लक रहातात.

विज्ञानाकल जीव दोन प्रकारचे असतात; समाप्तकलुष व असमाप्त कलुष. ज्या जीवाचा आणव मलही निघून गेला आहे त्याला विद्येश्वर असेही नाव आहे. अनंत, श्रीकंठ, शिखंडी, एकनेत्र, शिव, रुद्र वगैरे आठ विद्येश्वर आहेत. हे समाप्तकलुष आहेत. असमाप्तकलुष विज्ञानाकल जीवांना सात कोटी मंत्रजपानंतर भगवान शिवाच्या कृपेने उन्नतीचा लाभ होतो. त्याचप्रमाणे प्रलयाकल व सकल जीवाचेही प्रत्येकी दोन दोन विभाग आहेत. सकल जीवांचा पहिला विभाग पंच कलुष म्हणून प्रसिद्ध आहे. कलुषापासून यांची मुक्ति होण्याच्या हे अगदी जवळ असतात; आणि ईश्वर दीक्षागुरूच्या शापाने त्याना मोक्षाचा लाभ मिळवून देण्यास साहाय्य करतो. दुसरा विभाग अपक्व कलुषांचा त्यांची मुक्ति होण्याचा संभव नसतो; म्हणून ते सुखदुःखादि कर्मफले भोगीत असतात. पाश चार प्रकारचे असतात; मल, कर्म, माया अगर उपादान-कारण, व रोधशक्ती अगर बाधा करण्याचे सामर्थ्य; भुस्सा ज्या प्रमाणे धान्याला वेढतो त्याप्रमाणे मळ जीवाला वेढून टाकतो. फलकामनेपायी केलेल्या कार्याला कार्म पाश म्हणतात. कर्म चांगले व वाईट असे असते. बीजांकुर न्यायाप्रमाणे ते अनादि व उत्तरोत्तर वाढणारे असे असते. प्रलयकाली विश्वप्रपंच जिच्यात विलीन होतो व नंतर सृष्टीचा प्रारंभ जिच्यापासून चराचराच्या रूपाने होतो, तिचे नाव माया. रोधशक्ती ही भगवान शिवाचीच एक शक्ती आहे; कारण तिच्या द्वाराच तो वर उल्लेखिलेल्या तिन्ही पाशांचे नियमन करतो. तो ज्या हेतूने जिवाची यथार्थ प्रकृती झाकून टाकतो त्या हेतूला अन्यतम पाश असे नाव आहे.

दक्षिण भारतात शुद्धशैव नावाचा आणखी एक शैव संप्रदाय यानंतरच्या काळात झाला. या धर्माचे विवरण विशिष्टाद्वैतवादात झालेले आढळते. शिव पुराणातला एक भाग, 'वायवीय संहिता' असून तो या मार्गचा प्रमाणग्रंथ आहे. या मताचा पहिला प्रतिपादक श्रीकंठ शिवाचार्य. त्याने, 'ब्रह्ममीमांसा' अगर ब्रह्मसूत्र याच्यावर एक भाष्य लिहिले. त्यात आपण श्वेताचार्यांचे शिष्य असल्यामुळे हा अधिकार आपल्याला प्राप्त झाला असे म्हटले आहे. श्रीकंठ शिवाचार्य कृत ब्रह्ममीमांसा ( सूत्र ) भाष्याचे संपादक पंडित एल्. श्रीनिवासाचार्य त्या ग्रंथाला लिहिलेल्या संस्कृतातल्या प्रस्तावनेत असे म्हणतात की काहींच्या मते शंकराचार्यांचा समकालीन ब्रह्मसूत्राचा दुसरा एक










भाष्यकार होता. नीलकंठ व श्रीकंठ शिवाचार्य ही एकच व्यक्ती असून तोच या भाष्याचा कर्ता. परंतु हे मत बरोबर नाही. श्रीकंठ हा रामानुजांच्या नंतरचा भाष्यकार आहे. बहुधा तो इसवी सनाच्या तेराव्या शतकातला असावा. तो संतान आचार्य कंडदेवराचा समकालीन असावा धर्मदर्शनांच्या दृष्टीने दोघांच्या मतात खूपच अंतर दिसते. श्रीकंठाच्या मते शैवमत श्रुती अगर वेदान्त यांच्यावर आधारलेले आहे. कंडदेवर वगैरे आचार्यांच्या मते त्याचा उगम वेदांत नसून आगम शास्त्रात आहे. श्रीकंठाचे मत असे होते की जीवात्मा व जड जग यांचा आणविक ( अणुमय ) उपादानसमूह भगवान शिवाच्या चिच्छक्तीच्या मुळे त्या शिवापासूनच उत्पन्न होतो. या शक्तीमुळेच संसार उत्पन्न होतो. हेच विशिष्टाद्वैताचे आणखी एक स्वरूप आहे. इसवी सनाच्या सोळाव्या शतकांत श्रीकंठविरचित ब्रह्मसूत्राच्या भाष्यावर शैवाचार्य अप्पय्या दीक्षित याने एक भाष्य लिहिले. त्यासंबंधी विवेचन सुरेंद्रनाथ दासगुप्त यांच्या ' History of Indian Philosophy ' या ग्रंथाच्या पाचव्या भागात आढळते.

मध्ययुगांत दक्षिण भारतात वीरशैव अथवा लिंगायतसंप्रदाय निर्माण झाला. हा बराच आधुनिक संप्रदाय आहे यात शंका नाही. माधवाचार्यांच्या ' सर्वदर्शन संग्रहा'त पाशुपत संप्रदायाचे वर्णन आहे पण याचे नाही. हा ग्रंथ चौदाव्या शतकातला आहे. शंकराचार्य, वाचस्पति व ' शंकरदिग्विजया'चा कर्ता आनंदगिरी हेदेखील या धर्मासंबंधी कुठलाच उल्लेख करीत नाहीत. त्यामुळे या संप्रदायाचे आधुनिकत्व लक्षात यावे. यांच्यात लिंगधारण करणे हा प्रमुख आचार समजला जातो. या संप्रदायाचा प्रवर्तक बसव तो बागेवाडीचा रहिवासी असून कानडी ब्राह्मण होता. तो तरुण असताना कल्याणचा चालुक्य राजा विज्जल याचा मंत्री होता. विज्जलाची कारकीर्द ११५७ ते ११६७ पर्यंतची होती. राजा जैनमार्गी असल्यामुळे याचे व त्याचे पटले नाही, बसवचे व राजाचे वैर धुमसत होते. कधी ते दोघे एकत्र येत तर कधी अलग होत. राजाने त्याला शिक्षा करण्याचेही योजले होते. पुढे विज्जल कुणा आततायी माणसाच्या हातून मारला गेला. बसवाने वीरशैव संप्रदायाचा पुरस्कार करण्यात त्यानंतर स्वतःला वाहून घेतले. त्याने कुठलाही ग्रंथ लिहिल्याचे आढळत नाही. पण कानडीत अनेक उक्ती व प्रवचने त्याच्या नावाने उपलब्ध आहेत. तो शिवाला ब्रह्म व स्वतःला त्याचा दीन दास म्हणवीत असे.

त्याच्यावर ' बसवपुराण ' नावाचा ' एक ग्रंथ लिहिलेला आहे. त्यात तो शिवाच्या नंदीचा अवतार आहे असे म्हटले आहे. वीरशैव धर्माच्या इतिहासाकडे पाहिल्यास असे आढळून येते की या धर्माचा उद्भव इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या दोनशे वर्षे अगोदर झाला असून, तो धर्म लुप्तप्राय झाला व बसवाने त्याचा जीर्णोद्धार केला. बसव या धर्माचा आद्य संस्थापक होता किंवा प्रचारक होता याबद्दल विद्वानात मतभेद आहेत. डॉ. भांडारकरांच्या मते त्याने वीरशैव धर्माला सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. डॉ. फ्लीट असे म्हणतात की एकांतद् रामय्या नावाचा एक शैव साधु होता. तोच या संप्रदायाचा संस्थापक होय. परंतु डॉ. भांडारकरांना हे मत मान्य नाही. त्यानी ' बसव पुराणात उल्लेखिलेल्या विश्वेश्वराराध्य, पंडिताराध्य, महायोगी एकोराम वगैरे या संप्रदायाच्या आद्य गुरुंच्या नावांबरोबर वीरशैव दीक्षाविधीतल्या पाच आचार्यांची नावे देऊन असे म्हटले आहे की हा संप्रदाय पूर्वी ब्राह्मण गुरुकरवी संस्थापित झाला. त्यांच्यापैकी काहींच्या नावामागे ' आराध्य ' अशी उपाधी असे. या आराध्यानीच लिंगायत संप्रदायाची पूर्वस्थापना केली; त्यात ब्राह्मणांचे वर्चस्व होते ते लिंगायताना मान्य झाले नाही.

लिंगायतमताचे ब्राह्मण लिंगी ब्राह्मण म्हणून प्रसिद्ध होते या ब्राह्मणांचे आचार्य व पंचम असे दोन विभाग होते. आचार्य या संप्रदायाचे पुरोहित होते. हे महादेवाच्या पाच मुखातून निघाले व वीर, नंदी, वृषभ, भृंगी व स्कंद या पाच गोत्रात विभागले गेले. पंचमांविषयी असे म्हणतात की ते महादेवाच्या ईशान या मुखातून पंचवक्त नावाचा एक गण निघाला. या गणेश्वराला पांच मुले होती. त्या पांच मुखातून मखारि, कालारि, पुरारि, स्मरारि व वेदारि नावाच्या पाच पंचमांची उत्पत्ति झाली. याचे गुरु आचार्य असत. लिंगी ब्राह्मण व जंगम एकच होत असे समजतात. जंगमांचे दोन भेद आहेत. विरक्त नावाचे जंगम ध्यान,







धारणा, तपश्चर्या करून मठाचे अधिपती होत. ते परिव्राजक होऊन विचित्र वेश धारण करून भारतभर फिरत. वीरशैव संप्रदायात त्याना सिंहासन असे नाव आहे. दुसरे जंगम लग्न करून संसार करीत. लिंगायतांचा दुसरा एक प्रकार शीलवंतांचा जंगम व हे शीलवंत ब्राह्मणांच्या उपनयन संस्काराप्रमाणे एक विधी करीत. जानव्याऐवजी गळयात शिवलिंग धारण करीत. ब्राह्मणांप्रमाणे त्यांचा संध्याविधि असे. त्या विधीत ते 'ओं नमः शिवाय' या त्यांच्या गायत्रीमंत्राखेरीज दुसरी शिवगायत्रीही म्हणत. ही गायत्री वैदिक गायत्रीप्रमाणेच आहे. शेवटी क्रम 'तन्नः शिवः प्रचोदयात्' एवढा बदल केलेला आहे. लिंगायतांनी जे सामाजिक सदाचार पाळले जात त्यात धूम्रपान, मद्यपान व मांसभक्षण वर्ज्य होते. बालविवाहाच्या विरुद्ध ते होते. विधवाविवाह त्याना मान्य होता. स्त्रियाही पुरुषाप्रमाणे दीक्षेच्या अधिकारी होत्या. ते करडे वेदविरोधक नसले तरी त्यांचे प्रमाणग्रंथ 'बसव पुराण' व 'चन्नबसव पुराण' हेच होते. वीरशैव धर्माचा उगम तत्वदर्शनाच्या दृष्टीने 'स्कंदपुराणा'तल्या 'श्रुतसंहिता' कामिकागम वगैरे प्राचीन ग्रंथात आढळते. परंतु त्यांचे पद्धतशीर शास्त्रीय दृष्टीने रचलेल्या ग्रंथातून जे प्रगटीकरण झाले ते मात्र रेणुकाचार्यांच्या, 'सिद्धांतशिखामणि', 'प्रभुलिंगलीला', मायीदेवाचे अनुभवसूत्र, इत्यादि ग्रंथांच्या द्वारा उशीरा झाले. 'सिद्धांतशिखामणि' व 'प्रभुलिंगलीला' या दोन ग्रंथात या शैवदर्शनाचा थोडासा परिचय आढळतो. सत्, चित् व आनंद या स्वरूपांत आढळणारे अद्वितीय परम ब्रह्म हेच शिवतत्त्व या नावाने ओळखले जाते. याचेच दुसरे नांव स्थल असे आहे. महत् वगैरे आदि विश्वसंसाराचे कारणबीज हेच आहे; त्याचप्रमाणे प्रलयकाळी प्रकृति व पुरुष यांच्यापासून उत्पन्न झालेल्या चराचराचा लय त्यातच होतो. त्यामुळे पहिल्या आदि कारणास्तव त्याला 'स्थ' व लयामुळे त्याला 'ल' असे पडून स्थल असे संयुक्त नाव प्राप्त झाले आहे. स्थलाचे लिंगस्थल व अंगस्थल असे दोन प्रकार आहेत. लिंगस्थलात उपास्य रुद्र शिव याचा अंतर्भाव होतो व अंगस्थलात उपासक जीवाचा समावेश होतो. म्हणूनच लिंगस्थल म्हणजे ईश्वर व अंगस्थल म्हणजे भक्त असा अर्थ त्यातून निघतो. भगवान शिवाच्या अंतर्गत शक्तीचे तिच्याच इच्छेनुसार दोन भाग पडतात. एका शक्तीचे नाव कला. ही शिवाचा आश्रय करते. दुसऱ्या शक्तीचे नाव भक्ति. ही जीवाचा आश्रय करते. जीवाला शिवाकडे आणणारी क्रियाशील अशी ही शक्ति आहे. लिंगस्थलाचे आणखी तीन भाग आहेत, भावलिंग, प्राणलिंग व इष्टलिंग. या तीन विभागांची निष्कल, सकल–निष्कल व सकल अशीही दुसरी नावे आहेत. भावलिंग हे परब्रह्मात्मक शिवाचे 'सत्' हे स्वरूप आहे; प्राणलिंग 'चित्' स्वरूप आहे आणि इष्टलिंग 'आनंद' हे आहे. भावलिंग हे सर्वात श्रेष्ठ तत्त्व आहे. प्राणलिंग हे सर्वात सूक्ष्म रूप आहे आणि इष्ट लिंग ही त्याची जड अभिव्यक्ति आहे. हे लिंगत्रय प्रयोग, मंत्र व क्रिया यांच्या योगाने कला, नाद व बिंदूत परिणत होते. या तीन लिंगाचे प्रत्येकी दोन दोन भाग होतात. महालिंग अथवा महात्मलिंग, प्रसादलिंग अथवा प्रसादघन लिंग, चरलिंग, शिवलिंग, गुरुलिंग व आचारलिंग; या सहा लिंगांचे आणखी एक नाव आहे; ते म्हणजे 'षड्स्थल' षड्विध लिंग सहा प्रकारे अनुप्राणित होऊन सहा रूपे धारण करते. या लिंगांच्या सहा शक्ती आहेत. त्यांची नावे अनुक्रमे चित् शक्ति, पराशक्ति, आदिशक्ति, इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति अशी आहेत.

अंगस्थलाचे म्हणजे जीवाचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे भक्ति. भक्तीचे तीन पर्याय आहेत; योगांग, भोगांग व त्यागांग अशी त्यांची नावे आहेत. योगांगामुळे जिवाचा शिवाशी संयोग होऊन तो परम सुखाचा अधिकारी होतो. भोगांगामुळे जीवाला शिवाशी सायुज्य प्राप्त होते. त्यागांगामुळे जीवाला जग हे अनित्य व मायामय आहे असा प्रत्यय येतो व त्याचा त्याग करण्यास तो समर्थ होतो.

योगांगाचे ऐक्य व शरण असे दोन प्रकार आहेत. ऐक्यभक्तीत एकरसाभक्ती असेही नाव आहे.

वीरशैव मताचे अंतिम उद्दिष्ट म्हणजे जीव व शिव अथवा अंगस्थल व लिंगस्थल यांचे कायम ऐक्य. वैष्णव विशिष्टाद्वैताचाच प्रभाव याच्यावर पडला आहे असे स्पष्ट दिसून येते.










अनुक्रमणिका

श्री. सेतुमाधवराव पगडी

# शहाजीराजे आणि मोगल : १६३०–१६३६ (उत्तरार्ध)

## बावीस रमजान (बारा मार्च १६३४)

शहाजाद्याने महाबतखानाच्या सल्ल्याने ठरविले की पुढील सरदारानी गनिमाच्या तळावर हल्ला करावा. सय्यदखानजहान, खान जमान, राजा जयसिंग, मुबारिजखान, राजा पीथलदास, राव सभसाल, रावकर्ण, मुबारकखान नियाजी, अहमदखान नियाजी, नगर बहादुर ख्वेशगी, आणि मालोजी भोसले. उत्तररात्री गनिमाच्या तळावर हल्ला करावा असे ठरले. त्याप्रमाणे तेवीस रमजानच्या आदल्या रात्री मोगल सैन्य निघाले. ते एक प्रहर दिवस निघाला असता गनिमाच्या तळावर पोहोचले. गनिमानी मोगलाचा हल्ला होणार हे आधीच जाणले होते. त्यांनी आपले बरेचसे बाजारबुणगे हलविले होते. त्यामुळे मोगलाना हवी तशी लूट मिळाली नाही. मागे मोगलांची काही लुटून गनिमानी गुरे ढोरे आणि उंट पळविले होते ते आणि गनिमाची जनावरे, आणि शस्त्रे ही मोगलाच्या हाती पडली. गनिमाचे सैन्य जवळच होते. राजा जयसिंग हा मोगलाच्या अघाडीवर (हरावल) होता. तो पुढे निघाला. गनिमाच्या अनेक पायदळ शिपायांना त्याने पकडले. तो पर्यंत सय्यदखानजहान, खानजमान आणि इतर सरदार हे जयसिंगला मिळाले आणि शत्रूवर तुटून पडले. मुरारी (जगदेव)चा भाऊ मुधोजी हा मुबारिजखानावर चालून आला. हे ऐकून खान जमानने राजा जयसिंग यास सय्यदखान जहान याच्या मदतीसाठी ठेवले. आणि तो स्वतः मुबारिजखानाच्या मदतीस धावून गेला. दोघानी मिळून गनिमावर हल्ला चढविला. मुधोजीला बाणाच्या दोन जखमा होऊन तो ठार झाला बाकीचे गनीम पळून गेले.

## बारा शव्वाल (एक एप्रिल १६३४)

महाबतखानाचा कारभारी काकापंडित हा रसद आणण्यासाठी बीडकडे गेला होता. गनिमाचे सरदार याकूत हबशीचा नातू आणि इतर यांनी चार हजार स्वारानिशी काका पंडितचा रस्ता रोखून धरला. महाबतखानाने शहाजाद्याला कळविले की गनीम इतरत्र (बीडच्या) गेले आहेत. या वेळी आपण गनिमांच्या तळावर हल्ला केल्यास उपयोग होईल. शहाजाद्याने स्वतः लढाईवर चलण्याची तयारी दाखविली. दुसऱ्या दिवशी छावणीच्या रक्षणार्थ जगराज, लहरास्प, मक्काताजखान, आणि इतर यांना ठेवण्यात आले आणि मोगल सैन्य गनिमांच्या तळावर हल्ला करण्यास निघाले. शहाजादा हत्तीवर स्वार झाला. सैन्याच्या मध्यभागी शहाजादा, खानखानान महाबतखान, राजा जयसिंग आणि राजा पीथलदास हे होते. खानजहान हा हरावलीला (आघाडीला) राहिला. खानजमान, मुबारिजखान, आणि राव सत्रसाल हे उजव्या फळीला, शुजाअतखान व मुर्तुजाखान हे डाव्या फळीला आणि खानदौरान हा चंदावल- (पिछाडीला) ला अशी योजना झाली.

गनिमांना या योजनेची बातमी या पूर्वीच लागली होती. त्यांनी आपले बुणगे तळावरून हलविले होते. तळाभोंवतालचा भाग पेटवून ते युद्धाच्या तयारीने उभे राहिले होते. मोगल सैन्य दिसू लागताच तिच्या उजव्या बाजूने गनीम हल्ला करू लागले. खानजमानने गनिमांवर हल्ला करून त्यांना मागे हटविले. सय्यद खानजहानही आपल्या समोरच्या गनीम तुकडीवर चालून गेला. याचवेळी राजा जयसिंग व राजा पीथलदास हे पुढे झाले आणि त्यांनी गनिमांना मागे रेटले. खानदौरान हाही पिछाडीकडून पुढे झाला. खानजमान व खानजहान यांनी पळत असलेल्या गनिमांचा पाठलाग करून कित्येकांना ठार मारले.

## मुरार जगदेव

या पळापळीत गनिमांचा सरदार मुरार जगदेव हा घोड्यावरून खाली आला. त्याच्या नोकराने त्याला आपल्या स्वतःच्या घोड्यावर बसवून लढाईतून बाहेर काढले. स्वतः नोकर मात्र ठार झाला.








यानंतर शहाजादा छावणीकडे परतला. संध्याकाळपर्यंत लष्करही परत आले.

### सुरुंग

मोगलांनीं किल्ल्याखाली सुरुंग पेरले होते. गनिमांनी काहींचा तपास लावून ते निकामी करण्याचा प्रयत्न केला. काही ठिकाणी जमिनीत पाणी लागल्यामुळे सुरुंग निकामी झाले.

शेरहाजी बुरुजांच्या मधोमध अल्लावर्दीखानाने सुरुंग लावून त्यात दारू भरली होती. स्वतः शहाजादा सुरक्षित (बोगदेवजा) रस्त्यावरून सुरुंगाजवळ गेला. अल्लावर्दीखानाने त्याच्या समोरच सुरुंग पेटविला. स्फोटामुळे शेरहाजीचा एक बुरुज उडला; पण ज्या वाटेने मोगल सैन्य आत जाऊ शकले असते ती वाट मोगलांच्या ताब्यात आली नाही.

### खानखानान व खानदौरानमध्ये कलह

खानदौरान नसीरीखान हा म्हणू लागला की खानखानान महाबतखान मारला जात होता. मी त्याचे प्राण वाचविले. यामुळे त्या दोघात द्वेष निर्माण झाला. महाबतखानाच्या वाईट वागणुकीने इतर अमीरउमराव नाराज झाले होते. या कारणाने गनिमाना महाबतखानाच्या योजनांची आगाऊ बातमी कळून त्या हाणून पाडता येत असत. किल्ल्याच्या वेढ्याबाबत महाबतखानाचे प्रयत्न निष्फळ ठरले. महाबतखानाने शहाजाद्याला विनंती केली की छावणीपासून दहाबारा कोसपर्यंत धान्य आणि गवत ही मिळत नाहीत. दर खेपेला दहावीस कोस तरी काहींचे रक्षण करीत आणावे लागते. यामुळे लष्करचे हाल होत आहेत. पावसाळाही नजीक आला आहे. आता येथे न थांबता बुऱ्हाणपुराकडे परत जावे हेच योग्य होय. शहाजादा हा महाबतखानाच्या सल्ल्याप्रमाणे वागत असे. जिल्हज महिन्याच्या तीन तारखेस (एकत्रीस मे १६३४) मोगल सैन्य परंड्याहून कूच करून बुऱ्हाणपूरकडे रवाना झाले.

### मोगलांचा पाठलाग

परंड्याचा वेढा उठवून मोगल सैन्य परत निघाले. जिल्हज महिन्याच्या सात तारखेस (पंचवीस मे) मोगल सैन्य बीड पासून अठरा कोसावर असलेला घाट ओलांडून मैदानात आले. मोगल सैन्याच्या पिछाडीला खानजमान, रावसत्रसाल, जगराज, रावकर्ण आणि इतर हे होते. गनिमांनी त्यांच्यावर हल्ला केला. उजव्या फळीला राजा जयसिंग, मुर्तुजाखान, आणि डाव्या फळीला असालतखान व खलीलुल्लाखान हे होते. ते खानजमानच्या मदतीस पोहोचले. त्यांनी गनिमांवर हल्ला करून कित्येकांना जखमी केले. लुटीत अनेक घोडी मोगलांच्या हाती पडली. यानंतर सव्वीस जिल्हज (तेरा जून १६३४) ला मोगल बुऱ्हाणपूरला पोहोचेपर्यंत त्यांना गनिमांकडून उपसर्ग झाला नाही.

परंड्याचा किल्ला न घेतल्यामुळे महाबतखानावर शहाजहान बादशहाची गैरमर्जी झाली. त्याने शहाजाद्याला आपल्याकडे बोलावून घेतले.

### महाबतखानाचा मृत्यु

दख्खनचा सुभेदार महाबतखान खानखानान हा बुऱ्हाण पूरला राहिला होता. तेथे आक्टोबर १६३४ मधे त्याचा मृत्यु झाला. ही बातमी बादशहाला चवदा जमादिलावल १०४४ हिज्री रोजी (आक्टोबर अखेर) कळली. बादशहाने माळव्याचा सुभेदार खानदौरान नसीरीखान याला आज्ञा केली की तुम्ही बालाघाटकडे तांतडीने जा आणि नवीन सुभेदाराची नेमणूक होईपर्यंत त्या प्रांतावर लक्ष ठेवा.

### शहाजहानच्या कारकिर्दीचे आठवे वर्ष
### तेरा नोव्हेंबर १६३४ पासून

अठरा नोव्हेंबर रोजी दक्षिणच्या सुभ्याची शहाजहानने पुढीलप्रमाणे व्यवस्था केली. बीजागड आणि नंदुरबार हे जिल्हे (सरकार) आणि हंडिया सरकारचे काही महाल हे पूर्वी माळव्याच्या सुभ्यात होते ते आता खानदेशला जोडण्यात आले.

खानदेश, वऱ्हाड आणि दख्खन हे पूर्वी एकाच सुभेदाराकडे असत. आता त्यांचे दोन भाग करण्यात आले. एक बालाघाट आणि दुसरा पाईन घाट.

बालाघाट सुभ्यात पुढील जिल्हे होते, दौलताबाद, अहमदनगर, पैठण, बीड, जालनापुर, जुन्नर, संगमनेर, फतेहाबाद (धारुर) वऱ्हाडचे काही महाल, आणि तेलंगण बालाघाट सुभ्याचे उत्पन्न एक अब्ज बीस कोटि दाम (शंभर दाम म्हणजे एक रुपया). बालाघाटवर सुभेदार म्हणून खानजमानची नेमणूक करण्यात आली.








पाईनघाटच्या सुभ्यात सगळा खानदेश आणि वऱ्हाडचा बहुतेक भाग, याचे उत्पन्न ब्याण्णव कोटि दाम. या सुभ्यावर खानदौरान याची नेमणूक करण्यात आली.

खानजमान बरोबर दौलताबाद येथे राजा जयसिंग, मुबारिज खान, राव सभसाल, आणि जगराज हे सरदार देण्यात आले. नसीरीखान खान दौरान बरोबर बुऱ्हाणपूर येथे राजा पहाडसिंग बुंदेला, माधवसिंग हाडा, आणि नजर बहादुर याना ठेवण्यात आले.

माळव्याच्या सुभ्यावर खान दौरानच्या ऐवजी अल्लावीर्दीखान याची नेमणूक करण्यात आली.

## शहाजीच्या हालचाली

तीन शाबान १०४४ हिज्री ( तेरा जानेवारी १६३५ ) रोजी शहाजहान बादशहाला दक्षिणेतील मोहिमेची हकीकत कळविण्यात आली. ती पुढील प्रमाणे:

दक्षिणचा सुभेदार महाबतखान हा मरण पावल्यावर ( आक्टोबर ( १६३४ ) शहाजी आणि निजामशाहीचे इतर सरदार हे ती संधी साधून दौलताबाद प्रांतात घुसले. आणि तेथे त्यानी रकमा वसूल करण्यास सुरवात केली. दौलताबादेस मुर्तुजाखान हा किल्लेदार होता. याच सुमारास नसीरीखान खानदौरान हा माळव्याहून बदलून बुऱ्हाणपूरला आला. त्याने बुऱ्हाणपूरच्या रक्षणाचे काम माधवसिंग आणि फै मीर फैजुल्ला यांच्याकडे सोपविले. तो स्वतः शहाजी आणि निजामशहाचे इतर सरदार यांच्या विरुद्ध लढण्यास निघाला. त्याच्याबरोबर पुढील सरदार होते. राजा जयसिंग, मुबारिजखान, जगराज बुंदेला, अक्रामखान बख्शी आणि वाकेनवीस हकीम खुशहाल, बाकीबेग उजबेक, मालोजी आणि परसोजी भोसले.

बुऱ्हाणपुराहून निघून खानदौरान नसीरीखान हा पाचव्या दिवशी जफरनगर ( जाफराबाद ) ला पोहोचला. तेथून निघून तीन दिवसात तो खडकीला आला. तेथे त्याला कळले की शहाजी वगैरे गनीम हे रामदुदा ( रामडोह ) कडे निघून गेले आहेत. एकोणीस तारखेस ( एक डिसेंबर १६३४ ) तो दौलताबादेहून रामडोहला आला. रात्री तेथून निघून दुसऱ्या दिवशी तो सकाळी दीड घटकाच्या सुमारास बाणगंगा ( गोदावरीच्या काठी आला. तेथे त्याला कळले की शहाजी वगैरे शेवगांवकडे गेले. खानदौरान नसीरीखान तिकडे निघाला तो संध्याकाळी शेवगांवला पोहोचला. सैन्याच्या हरावल ( आघाडीवर ) राजा जयसिंग, उजव्या व डाव्या फळीवर इतर सरदार यांना त्याने नेमले. शहाजी वगैरे गनीम शेवगांवपासून दोन कोसावर असलेल्या एका ओढ्याच्या काठी जमले होते. खानदौरान त्यांच्यावर चालून गेला. गनीम पळून गेले. खानदौरानने रात्री तेथेच तळ ठोकला. उत्तररात्री तो अमरापूरकडे रवाना झाला. तेथे त्याला कळले की गनीम मोहरी घाटाच्या मार्गे बालाघाटाकडे जाऊ इच्छीत आहेत. आणि आपले बुणगे मानिकदूदा घाटाने जुन्नरकडे पाठवीत आहेत. हे ऐकताच खानदौरान हा हा माणिकदूदा घाटाकडे निघाला. गनिमांपैकी एक तुकडी घाटावर आली होती. काहीजण बुणग्याचे रक्षण करीत होते. मोगलांना पाहून ते लढू लागले. इतरांना तोपर्यंत निघून जाण्याची संधि मिळावी हा त्यांचा हेतु होता. मोगलांनी त्यांच्यावर हल्ला चढवून अनेकांना ठार केले. गनिमाचे सगळे सामान, सुमारे आठ हजार बैलावर लादलेले धान्य, आणि बाण आणि इतर शस्त्रे यांनी भरलेल्या गाड्या ही मोगलाच्या हाती पडली. सुमारे तीन हजार माणसे कैद झाली.

खानदौरान हा तेथून निघून पाथर्डीला आला. पाथर्डीहून तो अहमदनगरला आला. अहमदनगर किल्ल्याचा बंदोबस्त आणि तेथील रसद ही पुरेशी असल्याची खात्री करून घेऊन तो पैठणला आला.

तेथे त्याला कळले की खानजमान ( बालाघाटवर नेमून आलेला सुभेदार) हा दौलताबादेच्या वाटेवर आहे. बालाघाटचे सरदार त्याच्या बरोबर होते. त्यांना त्याने दौलताबादेकडे खानजमानच्या तैनातीत पाठविले. तो स्वतः बुऱ्हाणपूरला परत गेला.

## बादशहाच्या कारकिर्दीचे नववे वर्ष

एक जमादिस्सानी १०४५ हिज्री ( दोन नोव्हेंबर १६३५) बुंदेलखंडातील झुंझार सिंगाचे बंड मोडून शहाजहान दक्षिणेकडे निघाला. शाबान महिन्याच्या पांच तारखेस ( चार जानेवारी १६३६ ) त्याने नर्मदा ओलांडली. त्यावेळी अल्लावर्दीखान हा बुऱ्हाणपूरला







सुभेदार म्हणून काम करीत होता. खानदौरानची पुन्हा माळव्याला बदली झाली होती. अल्लावर्दीखानाने बादशहाचे स्वागत केले.

विजापूरचा आदिलशहा हा निजामशाही सरदारांना विशेषतः शहाजीला मदत करीत होता. शहाजीने निजामशहाचे काही महाल आपल्या ताब्यांत आणले होते. आदिलशहा खंडणी पाठविण्यात टाळाटाळ करीत होता. गोवळकोंड्याचा कुतुबशहा हाही आदिलशहाच्या कलाने वागत होता.

शहाजहानने मुकरमतखानाला आदिलशहाकडे रवाना केले. आदिलशहाला त्याने कळविले की तुम्ही पेशकश देण्याची टाळाटाळ करीत आहात ती दाखल करा, निजामशहाचे काही महाल तुम्ही ताब्यात घेतले आहेत ते परत करा, शहाजी आणि निजामशहाची इतर माणसे यांना तुम्ही आपल्या राज्यात आश्रय आहे. त्यांना काढून तरी लावा अगर आपल्या चाकरीत तरी घ्या. नाहीतर तुमचे राज्य उध्वस्त करण्यात येईल. कुतुबशहाकडेही अब्दुल्लतीफ याला वकील म्हणून पाठविण्यात आले.

## शहाजीसंबंधी १६३६

निजामशहाला मोगलांनी हस्तगत करून ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैदेत ठेवले होते. शहाजीने निजामशाहीची इतर माणसे आपल्या अंकित व्हावी म्हणून निजामशाही घराण्यातील एका मुलाला त्याला निजामशहा म्हणून जाहीर केले. निजामशहाच्या मुलुखांतील काही महाल त्याने आपल्या ताब्यात आणले. व तो मोगलांना विरोध करू लागला.

## मोगल सेनापतींची नेमणूक

शहाजहान दौलताबादेस पोहोंचल्यानंतर त्याने शहाजी आणि इतर निजामशाही सरदार यांच्याविरुद्ध मोहीम उघडली. तीन सैन्ये तयार करण्यात आली. त्यांचे तीन सेनापति म्हणजे खानदौरान (नसीरीखान), खानजमान आणि शायिस्ताखान हे होत. त्यांना पुढीलप्रमाणे आज्ञा देण्यात आली.

आदिलशहाने शहाजी आणि इतर निजामशाही अधिकारी यांना मदत केली नाही, आणि या मोहिमेत तो सैन्य घेऊन मोगलाना मिळाला तर तुम्ही त्याच्या मुलुखात ढवळाढवळ करू नये. पण असे तो करणार नसेल तर तुम्ही त्याचा मुलुख उध्वस्त करा."

## खानदौरान नसीरीखान

खानदौरान नसीरीखान याच्या बरोबर वीस हजार सैन्य देण्यात आले. त्याच्यापाशी पुढील सरदार तैनात करण्यात आले.

( १ ) राजा जयसिंग ( २ ) राजा पीथलदास ( ३ ) मुबारिजखान ( ४ ) रशीद खान अन्सारी ( ५ ) राव रतनचा मुलगा माधवसिंग, ( ६ ) राजा गजसिंग याचा मुलगा अमरसिंग ( ७ ) लष्करखानाचा मुलगा सजावर खान ( ८ ) मुबारक खान नियाजी ( ९ ) नजर बहादुर ख्वेशगी ( १० ) इहतिमामखान ( ११ ) किजल बाशखान, ( १२ ) सय्यद आलम बारहा ( १३ ) नूरमहंमद अरबखान ( १४ ) जानसिपारखान ( १५ ) जैनखान कोकलताश याचा मुलगा मुगूलखान, ( १६ ) कजाकखान ( १७ ) लष्करखानाचा मुलगा लुत्कुल्ला, ( १८ ) अली मर्दानबहादुरचा मुलगा करमुल्ला ( १९ ) गोकुळदास शिसोदिया ( २० ) महेशदास राठोड ( २१ ) रशीदखानाचा भाऊ हादीदाद ( २२ ) ख्वाजा इदायतुल्ला आणि दख्खनी सरदारांपैकी ( २३ ) सरअफराजखान, ( २४ ) जौहरखान हबशी ( २५ ) उदाजीरामाचा मुलगा जगजीवन ( २६ ) सादत भकरी आणि इतर.

या सैन्याची बख्शीगिरी इसहाकबेगकडे देण्यात आली. या सैन्याची हरावल ( अघाडी ) राजा जयसिंग, राज पीथलदास, अमरसिंग आणि इतर रजपूत यांच्याकडे असावी. पिछाडी मुबारिजखान आणि त्याचे अफगाण सैनिक यांनी सांभाळावी. खानदौरान नसीरीखान याला पुढील आज्ञा देण्यात आल्या. कंधार आणि नांदेड हे भाग विजापूर आणि गोवळकोंडा राजांना लागून आहेत. तिकडे जाऊन खानदौरानने आपला तळ द्यावा. आणि उदगीर आणि औसा हे किल्ले जिंकून घ्यावे.

## खानजमान

खानजमान या सेनापतीबरोबर वीस हजार सैन्य देण्यात आले. त्याच्याकडे देण्यात आलेले सरदार पुढील प्रमाणे, ( १ ) बहादुरखान रोहिला ( २ ) सय्यद शुजातखान, ( ३ ) शहाबेगखान ( ४ ) राव सत्रसाल








( ५ ) राजा पहाडसिंग बुंदेला ( ६ ) पृथ्वीराज राठोड ( ७ ) ख्वाजा बर्खुर्दार ( ८ ) भीम राठोड ( ९ ) राजा किशनसिंग बहदूरिया ( १० ) भगवानदास दला ( ११ ) उजेबकखान (१२) हकीम खुशहालबुग ( १३ ) हबीब किरानी (१४) राव तिलोकचंद ( १५) दिलेरहिंमत (१६) श्यामसिंग राठोड (१७) जगन्नाथ राठोड ( १८ ) मिर्जाशहारुखचा मुलगा मुगूल ( १९ ) मुख्त्यार खानाचा भाऊ सय्यदमिर्जा ( २० ) रावत दयाळदास झाला, व दख्खनी सरदारांत ( २१ ) मालोजी ( भोसले ) ( २२ ) कारतलबखान ( २३ ) पतंगराय जाधवराव ( लखूजी जाधवरावाचा मुलगा ) ( २४ ) अतिशखान हबशी ( २५ ) विठोजी (जाधव अचलोजीचा मुलगा) ( २६ ) बहादुरजीचा मुलगा दत्ताजी जाधव ( २७ ) रुस्तमराव ( २८ ) हाबाजी ( २९ ) बीरबलराव आणि ( ३० ) उदयपूरचा जगतसिंग याचा पुतण्या.

या फौजेची हरावल ( अघाडी ) राव सत्रसाल आणि इतर रजपूत यांच्याकडे आणि पिछाडी ( चंदावल ) बहादुरखान आणि त्याचे अफगाण यांच्याकडे अशी योजना झाली.

खानजमानला पुढीलप्रमाणे आज्ञा करण्यात आली. तुम्ही अहमदनगरला पोहोचल्यानंतर त्याला लागून असलेले शहाजीचे चांभारगोंदा, हे गांव जिंकून घ्यावे आणि शहाजीच्या हातून कोंकण सोडवून घ्यावा. आमचा हुकूम आल्यावर त्या भागांत आदिलशहाचा मुलख आहे तो तुम्ही उध्वस्त करावा.

### शायिस्ताखान

शायिस्ताखानाबरोबर आठ हजार सैन्य देण्यात आले. त्याच्यापाशी पुढील सरदार तैनात करण्यात आले. ( १ ) अल्लावर्दीखान ( २ ) कुतुबुद्दीनखानाचा मुलगा शेख फरीद ( ३ ) यक्काताजखान ( ४ ) राजा संग्राम ( ५ ) सय्यद अबुल्फतह ( ६ ) सय्यद अब्दुल्वहाब ( ७ ) मीरहाजचा मुलगा मीर जाफर; दख्खनी सरदारांपैकी ( ८ ) सादतखान विजापुरी ( ९ ) राऊतराव ( १० ) सरवरखान (११) फरहानखान ( १२ ) मेदिनीराव.

शायिस्ताखानाला आज्ञा करण्यात आली की तुम्ही जुन्नर, संगमनेर, नाशिक आणि त्र्यंबक हे जिंकून घ्यावे.

सात रमजान १०४५ हिज्री ( पांच फेब्रुवारी १६३६ ) रोजी वरील तिन्ही सेनापतींना निरोप देण्यांत आला.

### अल्लावर्दीखानास आज्ञा

चांदोर आणि धोडप हे किल्ले असलेल्या भागांत सहा किल्ले शहाजीच्या ताब्यांत होते. दोन किल्ले भोजबल या किल्लेदाराच्या ताब्यांत होते. आणि इतर सहा किल्ले इतराच्या ताब्यांत. या सर्वांच्याकडून लगतच्या परगण्यांना उपद्रव होत होता. शहाजहानने अल्लावीर्दीखानास आज्ञा केली की शायिस्ताखानाच्या आठ हजार फौजेपैकी तुम्ही दोन हजार बरोबर घ्यावे आणि ते किल्ले जिंकून घ्यावे. ही आज्ञा रमजान ( चोवीस फेब्रुवारी ) रोजी देण्यात आली.

## सव्वाल महिन्याची पांच तारीख ( तीन मार्च १६३६ )

शायिस्ताखानाने बादशहाकडे अर्जी पाठविली तीत म्हटले होते की

### मोगल रामसेज घेतात

अहमदखान नियाजी याने रामसेज किल्ल्यांतून शहाजीची माणसे बाहेर काढली आणि किल्ला ताब्यात घेतला. साबाजी निंबाळकर दख्खनी ( हा रामसेजचा किल्लेदार असावा ) याला दहा हजार रुपये रोख बक्षीस म्हणून देण्यात आले.

### आदिलशहावर रोष

आठ सव्वाल ( सहा मार्च १६३६ ); आदिलशहाने उदगीर आणि औसा येथील किल्लेदारांना मदत म्हणून गुप्तपणे रकमा पाठविल्या. आणि त्यांच्या किल्ल्यांचे रक्षण करण्यासाठी खैरियतखान याला बरोबर सैन्य देऊन तिकडे रवाना केले. आदिलशहाने शहाजीलाही मदतीची आश्वासने दिली. आणि त्याच्या मदतीसाठी रणदुल्लाखानाला सैन्य देऊन पाठविले. ही बातमी कळल्यावर बादशहाला क्रोध आला. या तारखेस ( आठसव्वाल. सहा मार्च १६३६ ) त्याने सय्यदखानजहानला सैन्य देऊन रवाना केले.

### सेनापति सय्यदखानजहान

सय्यदखानजहान बरोबर दहा हजार सैन्य देण्यात आले. त्याच्याकडे पुढील सरदार तैनात करण्यात आले.








(१) सिपहदारखान (२) रुस्तमखान (३) शहानवाजखान सफवी, (४) मुर्तुजाखान (५) सफशिकनखान रजवी (६) रावकर्ण (७) खलीलुल्लाखान (८) मिर्जा हैदर सफवीचा मुलगा नौदर, (९) मिर्जा रुस्तम सफवीचा नातू मुरादकाम (१०) शेरखान तरीन (११) अहदाद महमंद (१२) हरिसिंग राठोड (१३) किलेदारखान (१४) राजा रोज अफजूनचा मुलगा राजा बहरोज (१५) सय्यद लुत्फे अली भकरी (१६) राजा अनूपसिंगाचा मुलगा जयराम (१७) ख्याजा अबुलबका (१८) शहाबेगखान काबुलीचा मुलगा याकूबबेग (१९) रावरतनचा नातू इंद्रसेन (२०) सफदरखान इस्माईल अताईचा मुलगा अब्दुलहादी. दक्षिणी सरदारांपैकी (२१) महलदारखान (२२) मंगोजी (माणकोजी), (२३) फरखुल्मुल्कचा मुलगा हसनखान (२४) शर्जाराव (२५) कृष्णाजी (२६) यशवंतराव आणि इतर.

सय्यद खान जहानला निरोप देतेवेळी बादशहाने पुढीलप्रमाणे आज्ञा केली " खानजहान, खानदौरान आणि नजमाखान, यांनी तीन मार्गांनी आदिलशहाच्या राज्यावर चढाई करावी. शत्रु हा (शहाजी वगैरेना) रणदुल्ला मदत घेऊन येत आहे त्याला अडवून माघारी परतवावे. विजापूर राज्यावर हल्ल्यावर हल्ले चढवून ते उध्वस्त करून सोडावे. पण आदिलशहा शरण आला तर त्याला त्रास देऊ नये.

### अकरा शव्वाल (नऊ मार्च १६३६)

(नऊ मार्च) शव्वालच्या अकरा तारखेस शायिस्ताखानाचे पत्र आले त्यात पुढील मजकूर होता. खैर दुर्गचा किल्लेदार सालेहबेग हा पूर्वी निजामशहाचा नोकर होता. त्याने बादशाही चाकरीत येण्याची इच्छा दर्शविली. शहाजीची माणसे खैरदुर्गच्या किल्ल्यात होती. त्यांना त्याने कैदेत टाकले. आणि किल्ला आणि त्याखालचे परगणे हे मोगलाच्या हवाली केले.

### चार जिल्काद १०४५ एक एप्रील १६३६

चार जिल्काद (एक एप्रील) रोजी बादशहाने बागलाणचा राजा बहिर्जी याला खिलतीची वस्त्रे देऊन अल्लावीर्दी खानाच्या सैन्यात तैनात करून पाठविले.

### अकरा जिल्काद आठ एप्रिल १६३६

बादशहाने आदिलशहाकडे मुकरमतखान यास पाठविले होते. त्याच्या पत्रावरून कळले की वरकरणी आदिलशहा सामोपचाराचा आव आणीत असला तरी आपल्या कारभाऱ्याच्या सल्ल्यानुसार तो संधि सापडताच विरोध करण्याची इच्छा बाळगून आहे. बादशहाने विजापूर राज्यात घुसून ते उध्वस्त करण्याची आपल्या सेनापतींना आज्ञा केली.

### अल्लावर्दीखानाची मोहीम

अल्लावर्दीखान हा शायिस्ताखानाच्या फौजेत होता. नाशिक त्र्यंबक भागातील किल्ले जिंकून घेण्याची कामगिरी त्याच्याकडे देण्यात आली. बादशहाची आज्ञा मिळाल्यावर तो घोडप किल्ल्याच्या दिशेने निघाला. तो प्रथन चांदूरच्या किल्ल्याच्या पायथ्याशी आला. त्याला वेढा घालून आणि खूप मेहनत करून त्याने तो किल्ला शव्वाल महिन्याच्या सोळा तारखेस (चवदा मार्च १६३६) जिंकून घेतला.

### अंजनेरीचा किल्लेदार गंभीरराव

मोगलानी चांदूर घेतल्याचे पाहून त्या भागातील इतर मातबर माणसे मोगलाना शरण येऊ लागली. याला सुरवात अंजनेरीच्या किल्लेदारापासून झाली. अंरजाही– (अंजनेरी) चा किल्लेदार गंभीरराव (राधामाधवविलास चंपू आणि पर्णाल पर्वत ग्रहणाख्यान यांचा कर्ता जयराम पिण्डये हा गंभीररावाचा मुलगा) याने मोगलापाशी अभय मागितले. तो अल्लावर्दीखानाला येऊन भेटला.

### एकोणीस सव्वाल १०४५ सतरा मार्च १६३६

एकोणीस शव्वाल सतरा मार्च रोजी गंभीररावाने अंजराही– (अंजगेरी) चा किल्ला मोगलांच्या हाती दिला. इतरानाही खात्री वाटावी या हेतूने अल्लावर्दीखानाने गंभीररावासाठी दोन हजार जात आणि एक हजार हजार स्वार अशा मन्सबीची व्यवस्था केली. याशिवाय त्याने गंभीररावाला सरकारी खजिन्यातून पन्नास हजार रुपये रोख बक्षीस म्हणून दिले. किल्ल्यात आपल्या तर्फे शिबंदी ठेवून तो कांचन मांचन या किल्याकडे वळला. हे दोन्ही किल्ले घोडपच्या किल्लेदाराच्या ताब्यात होते.










## एकवीस शव्वाल १०४५

## एकोणीस मार्च १६३६

एकवीस शव्वाल एकोणीस मार्च रोजी अल्लावर्दीखान हा कांचन मांचन किल्ल्यापाशी आला. किल्ल्याच्या जाण्या येण्याच्या वाटा त्याने पाहिल्या. त्याने मोर्चे कायम केले. मुख्य दरवाजा समोरच्या मोर्च्यावर यक्का ताजखान, किल्ल्याच्या उत्तरेस अल्लावर्दीखानाचा मुलगा गजन्फर, दुसरा मुलगा हसनअली हा किल्ल्याच्या दक्षिणेस, किल्ल्याच्या मागे सरदारखान अशी अल्लावर्दीखानाने आपल्या अधिकाऱ्यांची योजना केली. सगळ्या मोर्च्यांची बातमी जेथे मिळू शकेल अशा मध्यवर्ती ठिकाणी तो बसला. हुषारी मिळताच सर्वांनी एकदम किल्ल्यावर हल्ला चढवावा असे ठरले. त्याप्रमाणे मोगलानी किल्ल्यावर हल्ला चढविला. किल्ल्यावरून बाण, बंदुकीच्या गोळ्या आणि मोठे दगड यांचा वर्षाव होत होता. त्याला न जुमानता मोगल हल्ला करीत होते. मोगलांचा निर्धार पाहून किल्ल्यातील लोक घाबरले. अंजराही ( अंजनेरी ) चा किल्लेदार गंभीरराव हा अल्लावर्दीखानाच्या बरोबर होता. त्याने किल्ल्यातील शिबंदीला निरोप पाठविला की किल्ला मोगलाच्या हवाली करण्यात आला तर मी तुमची सोडवणूक करीन. किल्ल्याचे अधिकारी मोगलापाशी अभय मागू लागले. आपल्या भावाला किल्ल्यात पाठविले. आणाभाका होऊन किल्ल्याच्या अधिकाऱ्याना अल्लावर्दीखानापाशी आणण्यात आले. कांचन मांचन हे दोन्ही किल्ले मोगलाच्या हवाली करण्यात आले.

## मोगल इतर किल्ले घेतात.

याच प्रमाणे मोगलानी खळा, जवळा, अहिवंत, कोळ, पोसरा अचलागड आणि इतर किल्ले घेतले.

## राजबीर ( राजदेर ) ला वेढा

राजबीरच्या किल्ल्यात निजामशहाची आप्त मंडळी राहात होती. किल्लेदाराने किल्ल्याचा बंदोबस्त उत्तम राखला होता. मोगलानी घातलेला वेढा दोन महिने चालला. मुहरम ( १०४६ हिज्री ) महिन्याच्या मध्यात ( नऊ जून १६३६ ) मोगलानी तो किल्ला जिंकून घेतला. निजामशाही घराण्यातील माणसे कैद झाली.

## घोडप मोगलाकडे एकोणीस जून

राजदेर जिंकून घेतल्यानंतर ( नऊ जून १६३६ ) अल्लावीर्दीखान हा घोडप किल्ल्याकडे वळला. घोडप किल्ल्यावर भोजबल हा किल्लेदार होता. मोगलानी इतर किल्ले जिंकून घेतल्याचे ऐकून भोजबलने अल्लावर्दीखानाकडे निरोप पाठविला की मला एक लाख रुपये रोख आणि योग्य अशी मन्सब ही मिळाल्यास मी मोगलाना हा किल्ला देण्यास तयार आहे. अल्लावर्दीखानाने बादशहाकडे भोजबलची विनंति पोहोचविली. बादशहाने भोजबलला एक हजार जात आणि आठशे स्वार अशी मन्सब आणि एक लाख रुपये नगद ही दिली. त्यानंतर पंचवीस मुहरम १०४६, एकोणीस जून १६३६ रोजी घोडपचा किल्ला मोगलाच्या ताब्यात आला.

## शायिस्ताखानाच्या हालचाली

इकडे अल्लावर्दीखान हा चांदूर, घोळप इत्यादि किल्ले जिंकून घेत होता त्या सुमारास शायिस्ताखानाने संगमनेर भागात चढाई केली होती. दहा शव्वाल १०४५ हिज्री, आठ मार्च १६३६ रोजी शायिस्ताखान हा संगमनेरला आला. शहाजीचा मुलगा ( संभाजी ) हा संगमनेरला होता. शायिस्ताखानाने त्याच्या ताब्यातून संगमनेर काढून घेतले. शहाजीचा मुलगा आणि इतर गनीम हे नाशिक प्रांताकडे गेले असे शायिस्ताखानाला कळले. त्याने कुतबुद्दीनखानाचा मुलगा शेख फरीद याची त्या (नाशिक) ठाण्यावर नेमणूक केली. अहमदखान नियाजी हा दिंडोरीला, आणि अहदाद महमंदला अंकोला ही ठाणी देण्यात आली.

शेख फरीद हा नाशिकला येत आहे हे ऐकून गनीम कोंकणच्या दिशेने निघून गेले. शायिस्ताखानाने बाकर नावाच्या अधिकाऱ्याबरोबर दीड हजार स्वार देऊन जुन्नरप्रांत ताब्यात घेऊन गनिमाचा मोड करण्यासाठी पाठविले. या सुमारास बादशहाने शायिस्ताखानास आज्ञा केली की तुम्ही संगमनेरचा बंदोबस्त केला आहे. अहमदनगर प्रांत रिकामा आहे ( सैन्य विरहित ). तुम्ही ताबडतोब अहमदनगरकडे रवाना व्हावे. त्या प्रमाणे तो अहमदनगरकडे जाण्यास निघाला.










वाटेत त्याला कळले की बाकर शहाजीच्या मुलाचा पाठलाग करीत करीत कोंकणच्या दिशेने निघाला. जुन्नर येथे गनिमाची फार थोडी माणसे राहिली आहेत असे त्याला कळले.

## मोगल जुन्नर गांव घेतात

बाकरने सय्यद अकबरअली बुरयारी बरोबर पांचशे स्वार देऊन त्याला जुन्नरकडे पाठविले. त्याने जुन्नर गांवातून शहाजीची माणसे काढून लाविली. आणि आपल्या ताब्यात घेतले. शहाजीचा मुलगा आणि इतर गनीम हे माहुलीत आहेत असे बाकरला कळले. तो माहुलीकडे रवाना झाला.

या वेळी शहाजी हा चांभारगोंद्याला होता. त्याचा मुलगा संभाजी हा चांभार गोंद्याला शहाजीकडे आला. संभाजीने तेथून सैन्य आपल्या बरोबर घेतले आणि तो जुन्नरच्या किल्ल्याकडे ( शिवनेरी ) आला. तेथे शहाजीची बायकामुले होती. तो जुन्नर गांवाजवळ येऊन थडकला तेव्हा मोगल फौज गांवाबाहेर येऊन त्याच्याशी लढू लागली.

शायिस्ताखानाला ही बातमी लागताच त्याने स्वतःच्या सैन्यातील सातशेस्वार कुमक म्हणून जुन्नरच्या मोगल फौजेकडे पाठविले. गनिमानी त्या सातशे स्वारांची वाट अडविली. त्यांना जुन्नरच्या मोगल फौजेला मिळून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण त्यांना न जुमानता मोगलस्वार जुन्नर गांवातील मोगलांना जाऊन मिळाले. त्यांनी जुंन्नर गांवचा बंदोबस्त केला. आणि गनिमाना आत येऊ दिले नाही. गनिमानी जुन्नर गांवाला वेढा घातला. गांवात रसदेची टंचाई भासू लागली. मोगलानी शायिस्ताखानाला ही हकीकत लिहून कळविली. शायिस्ताखान तडक जुन्नरला आला. त्याने गनिमाना मागे हटवून भीमानदीच्या काठापर्यंत त्यांचा पाठलाग केला. नंतर तो जुन्नरला परत आला.

जुन्नरचा किल्ला (शिवनेरी) मजबूत आहे. एखाद्या लहान सैन्याने तो जिंकला जाणे शक्य नव्हते. म्हणून शायिस्ताखानाने बाकरला कोकणातून बोलावून घेतले आणि जुन्नर आणि त्या लगतचे महाल यांच्या बंदोबस्ताच्या कामावर त्याला नेमले.

अशा रीतीने शायिस्ताखानाने थोड्या अवधीत संगमनेर आणि जुन्नरचा प्रांत आपल्या ताब्यात आणला. संगमनेर आणि जुन्नर यांचे एकंदरीत सतरा परगणे असून त्यांचा वसूल दोन कोटि साठ लक्ष दाम (शंभर दाम म्हणजे एक रुपाया) होता. यानंतर शायिस्ताखान हा पांच जिल्हज (एक मे १६३६) रोजी बादशहाडे जाण्यास निघाला.

## खानदौरानच्या हालचाली

खानदौरान नसीरीखान हा बादशहाचा निरोप घेऊन निघाला तो कंधार—(नांदेडजिल्हा) ला पोहोचला उदगीर आणि औसा हे किल्ले जिंकून घेण्याची कामगिरी त्याला देण्यात आली होती. रसद व्यवस्थित पोहोचत राहावी म्हणून त्याने जागजागी ठाणी नेमली.

## उदगीर

शव्वाल (१०४५) महिन्याच्या सात तारखेस (पाच मार्च १६३६) खानदौरान नसीरीखान हा उद्गीर पासून एक कोसावर आला.

## विजापूर राज्यावर आक्रमण

तेथे खानदौरानला बादशहाचा पुढील हुकूम आला. " आदिलशहा खंडणी पाठविण्यात टाळाटाळ करीत आहे. तो आमची आज्ञा मानीत नाही. आम्ही सय्यदखान जहानला सोलापूरकडून आणि खानजमानला इंदापूरकडून विजापूर राज्यात घुसून तो भाग उध्वस्त करावा अशी आज्ञा केली आहे. तुम्ही बीदर मार्गे विजापूर राज्यात घुसून तिकडील परगणे उध्वस्त करावे. "

ही आज्ञा मिळाल्यावर खानदौरानने जड बाजार बुणगे बाजरा नदीच्या काठावर ठेवले आणि बारा शव्वाल (दहा मार्च १६३६) रोजी तो उद्गीर जवळून निघाला तो दुसऱ्या रात्री कल्याणी जवळ पोहोचला. ते गांव त्याने लुटले. तेथून दीड कोसावर असलेल्या नारायणपूर या गावाचीही त्याने लुटालूट केली. दुसऱ्या दिवशी तो भालकीला गेला. तेथे त्याने लूट केलेली मालमत्ता ठेवली. सहा दिवसानी तो तेथून निघाला. भालकी पासून दहा कोसावर, आणि बीदरपासून दोन कोसावर मकनाथ हे गाव आहे. ते त्याने लुटले. तीन दिवसात त्याने त्या भागातील पन्नास परगणे उध्वस्त केले. तेथून तो बाजरा नदीच्या काठावर आला. तीन दिवसानी तो फिरुन भालकीला आला.








आदिलशहाने मोलाच्या प्रतिकारासाठी बहलोल रणदुल्ला खानाचा काका खैरियतखान, याकूत हबशीचा नातू याकूत या सरदाराना पाठविले होते. त्यांच्या सैन्याची एक तुकडी मोगल लष्कराजवळ आली. मोगल फौजच्या आघाडीला राजा जयसिंग हा होता. त्याने विजापूरच्या तुकडीवर हल्ला करून तिला पळवून लावले. खानदौरान देवणीला आला. त्याने आपले बाजारबुणगे, जड सामान, आणि कैदी हे नांदेडला पाठविले. त्याच्या संरक्षणासाठी गेलेली पथके परत येईपर्यंत तो देवणीला थांबला. नंतर तो तेथून निघून गुलबर्ग्याकडे आला. त्या गावावरून तो पुढे निघाला आणि सुल्तानपूर आणि हीरापूर या गावावर हल्ला करून त्याने ती गावे लुटली. तेथून तो भीमा नदीकडे जात असता वाटेत विजापूरच्या सैन्याशी त्याला लढावे लागले. निकराची लढाई होऊन विजापूरचे सैन्य मागे हटले. त्यानंतर खानदौरान हा फीरोजाबाद या गावी आला हे गाव विजापूरपासून बारा कोसावर आहे तेथे त्याला कळले की आदिल शहाने विजापूर जवळचा शहापूर तलाव मोडून टाकला आहे. त्या भागात पाण्याची आणि रसदेची टंचाई होईल हे पाहून खान-दौरानने कमलापूर, वगैरे गावे लुटली आणि तो सुल्तान-पूरला परत आला. त्यानंतर कोटगीर, देगलूर अशी स्थळे करीत तो औसाजवळ येऊन पोहोचला. तेथे त्याला कळले की आदिलशहाने तहाची याचना केली आहे. उद्गीर आणि औसा हे निजामशाही हद्दीत होते म्हणून तेवीस मुहरम १०४६ हिज्री सतरा जून १६३६ रोजी तो उद्गीर घेण्याच्या हेतूने तिकडे वळला.

## खानजहानच्या हालचाली

शायिस्ताखान, अल्लावर्दीखान आणि खानदौरान यांच्या हालचाली आपण पाहिल्या. शायिस्ताखानाने संगमनेर घेतले. अल्लावीर्दीखानाने चांदूर, घोडप, अंज-नेरी, कांचन मांचन, खळा जवळा इत्यादि किल्ले घेऊन जुन्नर गावावर ताबा मिळविला. खानदौरानने बीदर मार्गाने विजापूर मार्गात गुलबर्ग्याच्या पलीकडे धडक मारली. आता आपण खानजहान या सेनापतीच्या हालचाली पाहू.

बादशहाचा निरोप घेऊन खानजहान हा धारूरला पोहोचला. त्याच्या सैन्याच्या हरावलला ( अघाडी ) शहानवाजखान सफवी होता. त्याच्या बरोबर पुढील सरदार देण्यात आले: ( १ ) राव कर्ण भूरतिया ( २ ) मिर्जा हैदर सफवीचा मुलगा नौजर, ( ३ ) मिर्जा रुस्तमचा नातू मुरादकाम ( ४ ) हरीसिंग राठोड ( ५ ) किलेदार खान ( ६ ) राजा अनूपलिंगाचा मुलगा जयराम.

उजव्या फळीवर :( १ ) रुस्तमखान ( २ ) अह-दाद महमंद ( ३ ) राजा रोज अफजूनचा मुलगा राजा बहरोज ( ४ ) सफदर खानाचा मुलगा ख्वाजा अब्दुल्हादी.

डाव्या फळीवर, ( १ ) मूर्तूजाखान ( २ ) शेर-खान तरीन ( ३ ) राजा रामदास.

पिछाडीला: ( १ ) सिपहदारखान ( २ ) खली-लुल्लाखान ( ३ ) राजा देवीसिंग ( ४ ) सय्यद लुत्फे अली भक्री.

धारुर मुक्कामाहून खानजहानने शिराढोण जिंकून घेण्यासाठी कृष्णाजी शर्जाराव याची नेमणूक केली. त्यानी शिराढोणवर हल्ला चढविला. रीहान सोलापुरी याच्या तर्फे अंबर नावाचा अधिकारी शिरढोणला होता. शव्वाल महिन्याच्या सव्वीस तारखेस ( चोवीस मार्च १६३६ ) तो किल्ल्याबाहेरील आंबराईत बसला असता हा हल्ला आला. तो घाबरून आपल्या शिपायासहित किल्ल्यात पळाला. मोगलांनी किल्ल्याला वेढा घालून तो तिसऱ्या दिवशी जिंकून घेतला. अंबरला कैद करण्यात आले. पण नंतर त्याला सोडून देण्यात आले. खानजहानने कृष्णाजी शर्जाराव याला शिराढोणवर नेमले. यानंतर तो धाराशिव ( सध्याचे उस्मानाबाद ) कडे निघाला वाटेतील परगणे उध्वस्त करीत तो शव्वाल महिन्याच्या एकोणीस तारखेस (सत्तावीस मार्च १६३६) धाराशिवला आला. ते गाव त्याने लुटले. तेथील ठाणेदारीवर त्याने अब्दुल्लाखान फिरोज जंग याचा पुतण्या अबुलबका याची नेमणूक केली. तेथून निघून सोलापूरपासून सहा कोसावर अस-लेल्या काटा या मुक्कामी आला. काटीला वेढा घालून त्याने तो किल्ला घेतला. नंतर त्याने देवगाव लुटले. तेथून तो साहोरा या गावी आला. तेथे रणदुल्लाच्या








सैन्याबरोबर त्याची थोडी चकमक झाली पण गनीम मागे हटले.

चिल्काद महिन्याच्या पाच तारखेस (दोन एप्रिल १६३६) विजापुरकरांनी मोगलाच्या चंदावलीवर (पिछाडी) हल्ला केला. हरावली (अघाडी) चा सरदार शहानवाजखान, सिपहदारखान आणि रुस्तमखान हे मदतीला धावले. दोन कोसपर्यंत विजापूरचे सैन्य लढत येत होते. खानजहान हा स्वतः शत्रूवर तुटून पडला या लढाईत विजापूरकराचा पराजय झाला. त्यांचा सेनापति रणदुल्लाखान हा जखमी होऊन घोड्यावरून खाली आला. त्याच्या एका सहकाऱ्याने त्याला घोड्यावर बसवून मैदानाबाहेर नेले.

यानंतर खानजहान धाराशिवला परत आला. तेथे तो जिल्काद महिन्याच्या मध्यापर्यंत थांबला. चवदा जिल्काद (अकरा एप्रिल) ला तो तेथून निघाला सात कोस मजल मारुन तो तुळजापूर जवळ आला. तेथे रणदुल्लाखान आणि त्याचा बाप फरहाद हे त्याच्यावर चालून आले. त्यांचा पराजय करून खानजहान हा धाराशिवला परत आला. शिरढोणला त्याने बाजार बुणगे ठेवले आणि तो गुलबर्ग्याच्या दिशेने निघाला.

जिल्हज महिन्याच्या पहिल्या तारखेस (सत्तावीस एप्रिल) औशापासून दोन कोसावर विजापूरच्या सैन्याने मोगल छावणीवर हल्ला चढविला. निकराची लढाई होऊन विजापूरकराचा पराजय झाला. यानंतर खानजहान बीडकडे जाण्यास निघाला. जिल्हजच्या अकरा तारखेस (सात मे १६३६) शिरढोणपासून आठ कोसावर मोगल आणि विजापूरकर याची पुन्हा निकराची लढाई झाली. विजापुरकरांच्या सैन्यात खेळोजी भसले, रीहान सोलापुरी हे होते. विजापूरकरांचा पराजय झाला. आणि मोगल सैन्य शिरढोणला आले. तेथून पुढे बाजरा ओलांडून ते धारूरला पोहोचले.

## खानजमानच्या हालचाली

आतां आपण खानजमानच्या हालचाली पाहू.

बादशहाचा निरोप घेउन खानजमान हा प्रथम अहमदनगरला आला. तेथे रसदेची व्यवस्था करण्यासाठी तो कांही दिवस थांबला. सैन्याच्या आघाडीवर बहादुरखान, उजव्या डाव्या फळीवर शुजाअतखान आणि शहाबेगखान, आणि पिछाडीवर रावसत्रसाल अशी व्यवस्था करून तो जुन्नरच्या दिशेने निघाला. तो प्रथम अकोलनेरला आला. हे गांव अहमदनगरपासून सहा कोसावर आहे. तेथे त्याला कळले ते असे. माहुली किल्ला मीनाजी (मंबाजी) भोसले याजकडे होता शहाजीने तो किल्ला आपल्याकडे घेतला. मीनाजी-(मंबाजी) ला तो आपल्याबरोबर जुन्नरला घेऊन आला. आतां पारगांवावरून परंड्याकडे जाण्याचा त्याचा बेत आहे.

ही बातमी ऐकून खानजमान अकोलनेरहून निघाला. जुन्नर जवळ राजपूर हे गांव आहे. तेथे त्याने आपला तळ दिला. दुसऱ्यादिवशी तो तेथून निघाला आणि एकोणीस कोसाची मजल मारुन तो पारगांवला आला. हे ऐकून शहाजीने पारगावला जाण्याचे टाळले. खानजमानला कळले की शहाजीने भीमा ओलांडली असून तो आदिलशाही राज्यांतील पुणे परगण्याच्या लोहगांव या स्थळी मुक्काम करुन आहे. खानजमानने ही हकीकत बादशहाला लिहून कळविली. तो स्वतः भीमेच्या कांठावर तळ देऊन राहिला. तिकडील परगण्यांच्या रक्षणाचे काम त्याने बहादुरखानाकडे सोपविले आणि शहाबेगखानाला चांभार गोंदा जिंकून घेऊन तेथे तळ देऊन राहाण्यास सांगितले.

## मोगल चांभारगोंदा घेतात

शहाबेगखानाने चांभारगोंद्याला वेढा घातला. किल्ल्यांतील सैनिकानी तीन प्रहरपर्यंत किल्ला लढविला. त्यानंतर त्यांनी अभय मागून किल्ला मोगलांच्या हवाली केला.

खानजमान हा जुन्नरकडे जाऊन त्या प्रांताचा बंदोबस्त करू लागला. इतक्यांत बादशहाचा हुकूम आला. त्यात म्हटले होते की जुन्नर प्रांताचा बंदोबस्त आणि शक्य झाल्यास जुन्नरचा किल्ला (शिवनेरी) जिंकून घेण्याची कामगिरी शायिस्ताखानाकडे देण्यास आली आहे. तुम्ही तिकडे न जाता विजापुरच्या राज्यांत घुसून तिकडचा प्रांत उध्वस्त करावा. शहाजी आणि त्याला मदत करणारे विजापूरचे सरदार यांचा मोड करावा.

या हुकुमानुसार खानजमान हा पुन्हा भीमानदीच्या काठावर आला. त्यांनी बुणगे आणि जडसामान ही बहादुरखानाकडे ठेवली.








## खानजमान विजापुर राज्यांत शिरतो

अठरा शव्वाल (सोळा मार्च १६३६) रोजी खानजमानने आदिलशाही मुलुखात प्रवेश केला. वाटेतील परगणे उध्वस्त करीत तो सव्वीस शव्वालला (चोवीस मार्च १६३६) दूदाबाईच्या घाटापाशी आला. तेथे त्याने पांचशे स्वार तैनात केले. मोगल घाट चढत असता अर्ध्यावाटेवर गनिमांनी त्यांच्यावर हल्ला चढविला. मोगलानी त्याना परतवून लाऊन दोन कोस पर्यंत त्याचा पाठलाग केला. रावसत्रसाल हा खान जमानच्या मागोमाग येत होता शत्रूच्या एका तुकडीने त्याच्यावर हल्ला चढविला. रावसत्रसाल याने हल्ला परतवून आला. या चकमकीत काही रजपूत ठार झाले. रावसत्रसाल खानजमानला येऊन मिळाला. यानंतर मोगलांनी घाट ओलांडला.

## मोगल कोल्हापूरजवळ

सात दिवसांनी मोगल सैन्य कोल्हापुराजवळ आले. किल्ल्यातील लोकानी प्रतिकार केला. पण मोगलानी लढून किल्ला घेतला. खानजमानने कोल्हापूरला तळ दिला. गनीम भोवतालच्या डोंगरातून एकत्र झाले आहेत असे कळल्यावरून खानजमानने तिकडे आपली पथके पाठविली. त्यानी गनिमांचा मोड करून बरीच लूट हस्तगत केली.

कोल्हापुराहून निघून खानजमान हा कृष्णेच्या काठावर पोहोचला. तेथे शहाजी आणि विजापूरचे सरदार हे आपल्या सैन्यासहित येऊन मोगल सैन्यावर बाण (रॉकेट वजा) फेकू लागले. असे तीन दिवस चालले. या काळात संधी मिळे तेंव्हा ते मोगलांशी लढा देत आणि मागे हटत. खानजमानने शहाबेग खानाबरोबर रजपुतांची एक तुकडी देऊन त्याला छावणीच्या रक्षणासाठी ठेवले आणि शत्रूच्या तळावर हल्ला करावा म्हणून तो मध्यरात्री निघाला. दिवस उजाडता तो शत्रूच्या तळावर पोहोचला. गनिमानी तो येणार हे ओळखून आपले बुणगे तळावरून हलविले होते. ते स्वतः खडे होऊन लढाईसाठी उभे राहिले होते. थोडीशी चकमक झाल्यावर ते निघून गेले. मोगलाना फार थोडी लूट मिळाली. आणि ते परत आपल्या छावणीत आले.

दुसऱ्या दिवशी मोगलाचे लष्कर कूच करू लागले. गनिमानी बहादुरखान आणि शुजाअतखान याच्या पथकावर हल्ला चढविला. मोगलानी त्याच्यावर-प्रतिहल्ला केला. ही चकमक चालू असताना शहाबेगखानानेही हल्ला चढवून शत्रूचा उधळून लावले.

## मोगल मिरज लुटतात

तेथून निघून खानजमान मिरजेला आला. विजापुर राज्यातील ते एक प्रमुख शहर आहे. खानजमानने ते शहर लुटले. तेथून निघून स्हादिवसानी तो रायबागला आला. ते लुटून त्याने बरीच मालमत्ता हस्तगत केली. रायबागला दहा दिवस राहून तो परत फिरला. गनीम मोगलाचा पाठलाग करीत. मधून मधून ते मोगलावर बाण फेकीत. मिरजेपासून आठ कोसावर त्याने नदीच्या काठावर तळ दिला. मोगलाची रसद तोडण्यासाठी, गनिमाचे लष्कर सारखे घिरट्या घालीत होते. मोगल सावधपणे आपल्या लष्कराचे रक्षण करीत. एकदा गनिमानी शहाबेगखानाच्या पथकावर हल्ला केला. खानजमानने एकीकडून आणि शहाबेगखानाने उत्तरे कडून गनिमाशी लढून त्यांचा दोन कोसपर्यंत पाठलाग केला.

यानंतर मोगल भीमेच्या काठावर येऊन पोहोचेपर्यंत त्यांना शत्रूकडून उपसर्ग झाला नाही.

या सुमारास बादशहाने त्याला आज्ञा केली की आदिलशहा शरण आला आला आहे. शहाजीने जुन्नर वगैरे किल्ले मोगलाच्या हवाली करावे म्हणजे मी त्याला आपल्या चाकरीत घेईन नाहीतर त्याचा मोड करण्यात मी आपल्याशी सहकार्य करीन असे आदिलशहाने कळविले आहे. सबब तुम्ही ताबडतोब माझ्याकडे निघून यावे. जुन्नर वगैरे किल्ले जिंकून घेणे आणि शहाजीचा मोड करणे इत्यादि बाबींसंबंधी तुम्हाला सूचना देण्यात येतील. बादशहाच्या हुकुमाप्रमाणे खानजमान त्याच्याकडे रवाना झाला.

जिल्काद महिन्याच्या वीस तारखेस (सतरा एप्रिल १६३६) मोगलांनीं अंकाई व टंकाई हे किल्ले जिंकून घेतले.

## शहाजी आणि मोगल, अखेरचा लढा

आदिलशहा शरण आला, त्याच्याशी करार केल्यानंतर शहाजहानने दक्षिणच्या सुभ्यावर सुभेदार म्हणून राजपुत्र औरंगजेब याची नेमणूक केली. शहाजहान हा अकरा जुलै १६३६ रोजी दौलताबादेहून उत्तरेकडे परत जाण्यास निघाला.










मोगलांच्या समोर आता दोनच कामे राहिली. एक शहाजीचा पाडाव आणि दुसरे उद्गीर आणि औसा हे किल्ले निजामशाही अधिकाऱ्यांकडून जिंकून घेणे. खानदौराननें उद्गीर औसा हे किल्ले अनुक्रमे अठ्ठावीस सप्टेंबर आणि एकोणीस आक्टोबर १६३६ रोजी जिंकून घेतले.

## शहाजीविरुद्ध मोहीम

१०४६ हिज्री एक जमादिस्सानी ( एकवीस आक्टोबर १६३६ ) ला शहाजहान बादशहाच्या कारकिर्दीचे नववे वर्ष सुरू झाले रजब महिन्याच्या बारा तारखेस ( एक डिसेंबर १६३६ ) मोगल सेनापति खानजमान याने जुन्नर किल्ला आणि त्या भोवतालचा भाग ताब्यात घेऊन दक्षिणी लोकांच्या विरुद्ध चाललेली मोहीम संपली असे वृत्त बादशहाला कळविले. त्याचा तपशील असा:—

बादशहाचा निरोप घेऊन खानजमान निघाला तो आपल्या सैन्याला येऊन मिळाला. त्याला कळले की शहाजीने आदिलशहाची चाकरी पत्करण्यास नकार दिला असून जुन्नर वगैरे किल्ले मोगलांना देण्याची त्याची इच्छा नाही. शहाजीचा पाडाव करून त्याचे किल्ले मोगलांच्या ताब्यांत देऊन टाकावे या हेतूने आदिलशहाने रणदुल्लाखानाला रवाना केले. त्याने मोगल सेनापतीशी सहकार्य करून. त्याच्या सल्ल्याने वागावे अशी आज्ञा आदिलशहानें रणदुल्लाखानला केली. खानजमान हा जुन्नरला आला. किल्ल्याच्या ( शिवनेरी ) येण्याजाण्याच्या वाटा त्याने नजरेखाली घातल्या. किल्ल्याच्या वेढयासाठी त्याने पुढील अधिकाऱ्यांची नेमणूक केली. बहादुरखान, कारतलबखान, रावतसिंग, औरंगखान, सय्यद मिर्जा, राणा जगतसिंहाच्या पदरचे एक हजार शिपाई, आणि एक हजार बर्कंदाज ( बंदूकची ). किल्ल्याभोवती मोर्चे व्यवस्थितपणे कायम करण्यात आले आहेत याची खानजमानने खात्री करुन घेतली. शहाजी त्यावेळी पुण्याच्या परिसरात होता. त्याचा मोड करण्यासाठी खानजमान हा जुन्नरहून निघाला. तो घोड नदीच्या काठावर आला. नदीला पूर आला होता आणि पावसाळाही जोरात होता. यामुळे खानजमानने तेथे जवळ जवळ एक महिना मुक्काम केला.

नदीचा पूर ओसरल्यानंतर खानजमानने घोड नदी ओलांडली. व तो लोहगावाजवळ इंद्रायणीच्या काठी आला. शहाजी त्यावेळी लोहगावपासून सतरा कोसावर होता. खान जमानच्या येण्याची बातमी ऐकताच तो कोंडाण्याच्या व तोरणांच्या डोंगराळ भागात निघून गेला. खान जमान आणि शहाजी यांच्या मध्ये इंद्रायणी, मुळा आणि मुठा या तीन नद्या होत्या. तिन्ही नद्यांना पूर आले होते.

रणदुल्लाखानाने खानजमानला लिहून कळविले होते की शहाजीकडून त्याच्या सर्व किल्ल्यांच्या किल्ल्या घेऊन तुमच्याकडे पाठवून देईन. माझे दुसरे पत्र येई पर्यंत आपण पुढे येऊ नये. खानजमानने आपला एक मनुष्य रणदुल्लाखानापाशी पाठवून शहाजीचा पाठलाग करण्याच्या बाबतीत त्याचा सल्ला विचारला. रणदुल्लाचे उत्तर आल्यानंतर खानजमान हा इंद्रायणीच्या कांठावरून परत फिरला. खानजमानने आपल्या सैन्याचे तीन भाग केले. एक भाग त्याने स्वतःपाशी ठेवला. दुसरा भाग राव सत्रसालकडे आणि तिसरा भाग पृथ्वीराजकडे अशी योजना करून तो नूर घाटाकडे निघाला.

या सुमारास शहाजी हा तातडीने कुंभा घाट पार करून कोकणात उतरला त्याने दंडराजपुरीचा ठाणेदार आणि त्या भागांतील इतर जमीनदार यांचा आश्रय मागितला. ते आश्रय देतील अशी त्याला अपेक्षा होती. पण यामुळे आपला परिणाम चांगला होणार नाही हें जाणून त्यांनी शहाजीला आपला हद्दीतून बाहेर पाठविले. त्यामुळे शहाजीचा निरुपाय होऊन तो कुंभा घाटावरून परत वर आला.

या सुमारास मोगल सैन्य त्याच घाटावरून कोकणांत उतरले. रणदुल्लाखान हाही कुंभाघाटाजवळ येऊन पोहोंचला.

हे पाहून शहाजी हा माहुलीच्या किल्ल्याकडे पळाला. रणदुल्लाखान हा अद्याप खानजमानला येऊन मिळाला नव्हता. तरीपण खानजमानने शहाजीचा पाठलाग सुरू केला. खानजमानला बातमी मिळाली की शहाजी हा मुरंजन किल्ल्यावर पोहोचला असून तेथे तो काही काळ थांबणार आहे. त्यावेळी खानजमान हा मुरंजनपासून पंधरा कोस अंतरावर होता. तो तेथून निघून मुरंजनपासून तीन कोसावर आला.








डोंगराची चढण कठीण, शिवाय जिकडे तिकडे चिखल त्यामुळे खानजमानबरोबर सैन्य थोडे होते. तेथे गनिम आणि मोगल समोरासमोर आले. शहाजीने आपले काही सामान पुढे रवाना केले. बाकीच्यांना तेथे ठेऊन तो पाठीमागून निघाला तो काही अंतर तोडून गेला होता इतक्यात मोगलांनी त्याच्या सैन्यावर हल्ला चढविला. त्यात शहाजीची अनेक माणसे ठार झाली. मोगलांनी जवळ जवळ बारा कोसपर्यंत त्याचा पाठलाग केला.

रस्त्यातील चिखल आणि हवेतील गारवा यामुळे खानजमानच्या सैनिकात पुढे चालण्याची शक्ति राहिली नव्हती. यामुळे ही संधी साधून शहाजी तेथून निसटला. मोगलांच्या हाती लष्करचे सामान, घोडे, उंट, इत्यादि सापडली. निजामशाही घराण्यातील एका माणसाला शहाजीने निजामशहा म्हणून जाहीर केले होते. त्याला शहाजीने आपल्याबरोबर बाळगले होते. त्याची पालखी, छत्र, नगारे, निशान ही मोगलांना मिळाली.

मोगलांनी तेथून जवळच रात्रीसाठी मुक्काम केला. खानजमानच्या सैन्याचे तंबू डेरे हे अद्याप पोहोचले नव्हते. शहाजीच्या सैन्यातील तंबू मोगलांच्या हाती लागले होते. तेच उभे करून मोगलांनी त्या तळावर विश्रांति घेतली.

शहाजीने एक रात्र आणि दिवस प्रवास करून माहुलीचा किल्ला गाठला. त्याने प्रथम विचार केला की त्र्यंबक आणि भिंगलवाडी यांच्या दिशेने जावे. पण वाटेत आपण मोगलांच्या हाती सापडू या भीतीने तो माहुलीलाच राहिला. त्याच्याशी एकनिष्ट असणाऱ्यांना त्याने आपल्याबरोबर ठेवले. इतरांना त्याने निरोप दिला. शहाजी आणि त्याचा मुलगा हे थोडासा सरंजाम बरोबर घेऊन माहुलीच्या किल्ल्यात दाखल झाले.

त्यावेळी खानजमान हा माहुलीपासून बाराकोसावर होता. रस्ता मोठा अडचणीचा होता. असे असूनही खानजमान एक दिवसात माहुलीच्या पायथ्याशी पोहोचला. किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली शहाजीची चौकी पाहाऱ्याची माणसे आणि रसद किल्ल्यात पोहोचविणारे लोक ही मोगलांना पाहून घाबरून पळून गेली. त्यांनी जमविलेली रसद मोगलांच्या हाती पडली.

खानजमानने किल्ल्याच्या प्रवेशद्वारासमोर मोर्चा कायम करून त्यावर राजा पहाडसिंग बुंदेला याची नेमणूक केली. किल्ल्यात जाण्याच्या वाटा त्याने अडवून धरल्या.

या सुमारास रणदुल्लाखान माहुलीला येऊन पोहोचला. किल्ल्याचा दुसरा दरवाजा हा पहिल्या दरवाजापासून सात कोसावर आहे. मधे डोंगराळ भाग आणि दाट जंगले ही आहेत. रणदुल्लाखानाने या दुसऱ्या दरवाजासमोर आपला मोर्चा कायम केला. हे दोन्ही मोर्चे कायम झाल्यानंतर किल्ल्यांतील लोकांची परिस्थिति कठीण झाली. शहाजीने खानजमानला कळविले की हा किल्ला मी आपल्या ताब्यात देण्यास तयार आहे. पण अट ही की मला आपण बादशहाच्या चाकरीत घेण्याची व्यवस्था करावी.

खानजमानने त्याला कळविले की तुम्हाला स्वतःची सोडवणूक करून घेण्याची इच्छा असेल तर तुम्ही आदिलशहाला मिळावे. बादशहाचा हाच हुकूम आहे. नाहीतर लवकरच तुझा नाश होईल. निरुपाय होऊन शहाजीने आदिलशहाकडून आश्वासन मागितले. आदिलशहाने घातलेल्या अटी त्याला पसंत पडल्या नाहीत.

किल्ल्याचा वेढा दिवसेदिवस कठीण होऊ लागला. किल्ला आता पडणार अशी चिन्हे दिसू लागली. शहाजी हा किल्ल्यावरून उतरला आणि किल्ल्याच्या उतरणीवर मध्यभागी रणदुल्लाखानाला भेटला. निजामशहाला त्याने रणदुल्लाखानाच्या हवाली केले आदिलशहाची नोकरी पत्करण्याचे त्याने कबूल केले. जुन्नर ( शिवनेरी ) वगैरे किल्ले मोगलांच्या हवाली करण्याचे त्याने कबूल केले. आदिलशहाचा वकील काजी अबूसईद याने शहाजीसाठी आदिलशहाकडून अहदनामा (करार) आणला होता. शहाजीने अबूसईद आणि स्वतःचा एक वकील यांच्याबरोबर एक पत्र लिहून दुसऱ्या दिवशी सकाळी खानजमानकडे पाठविले. पत्रात त्याने शहाजीने काही विनंत्या केल्या होत्या.

या बाबतीत शहाजहान बादशहाचा काही हुकूम खानजमानला मिळाला नव्हता. म्हणून त्याने शहाजीच्या पत्राचे उत्तर न देता काजी अबूसईदला निरोप दिला. खानजमानने शहाजीचे पत्र आणि स्वतःची अर्जी ही बादशहाकडे पाठविली. यावर बादशहाने उत्तर पाठविले. त्यात शहाजीच्या विनंत्या मान्य करण्यात आल्या होत्या. खानजमाने बादशहाचा निर्णय कळवून शहाजीचे समाधान केले.

शहाजीने काजी अबूसईद बरोबर आपली विश्वासू माणसे खानजमानकडे पाठविली. आपल्या माणसांबरोबर शहाजीने जुन्नर (शिवनेरी), त्र्यंबक, यिगलवाडी, हरीश, जिवधन, जोंद, आणि हरसरा या किल्ल्यांच्या सोडचिठ्ठया पाठविल्या. ही माणसे खानजमानकडे पोहोचली. त्याने प्रत्येक किल्ल्यावर अधिकारी नेमले आणि प्रत्येक किल्ल्यात शिबंदी म्हणून सैनिकांची व्यवस्था केली. हे मोगल अधिकारी आणि सैनिक शहाजीच्या कारभाऱ्याबरोबर देण्यात आले. खानजमानने आपल्या अधिकाऱ्यांना बजाविले की तुम्ही लवकर किल्ल्याकडे जाऊन ते ताब्यात घ्या. ही मोहीम व्यवस्थितपणे पार पडल्याची त्याने खात्री करून घेतली. शहाजीने निजामशहाला रणदुल्लाखानाच्या हवाली केला होता. निजामशहाला मोगलांच्या हवाली करण्याबद्दल रणदुल्लाखानाने आदिलशहाची आज्ञा मागितली होती. आदिलशहाकडून उत्तर येईपर्यंत खानजमान हा त्या भागात काही दिवस थांबला. थोड्याच दिवसात आदिलशहाकडून आज्ञा मिळाली. त्या प्रमाणे रणदुल्लाखानाने निजामशहाला खानजमानच्या हवाली केला. यानंतर स्वतः रणदुल्लाखान हा शहाजीला बरोबर घेऊन विजापूरकडे रवाना झाला.

खानजमान हा तेथून निघून दौलताबादेकडे निघाला तेथे पोहोचून तो राजपुत्र औरंगजेब याच्या सेवेत हजर झाला.

---










श्री. प्र. रा. देशमुख

# नित्याच्या उपयोगाची सिंधुलिपी व तिचे वाचन (पूर्वार्ध)

## सिंधुमुद्रा खेरीज नित्याच्या उपयोगाची वेगळी सिंधुलिपी असल्याची कल्पना कोणासही नाही.

सिंधुलिपी म्हटले की सिंधुमुद्राच डोळ्यापुढे येतात. सिंधुमुद्रातील चित्रासारख्या दिसणाऱ्या चिन्हगुंफणा-खेरीज मुद्रांतील चिन्हाशी, ब्राह्मी अक्षराशी व प्रचलित लिपीतील अक्षराशी जुळणारी सिंधुलोकांची नित्याच्या उपयोगाची वेगळी लिपी सिंधु उत्खननात उपलब्ध झाली असून अस्तित्वात आहे याची कल्पना कोणा-लाही असलेली दिसत नाही. ही परिस्थिती सिंधु संस्कृतीचा आणि लिपीचा अभ्यास करणाऱ्या व सिंधुउत्खननाशी संबंधित असलेल्या सर्व विद्वानांची सारखीच आहे. मुद्रातील चिन्हगुंफणाशिवाय सिंधु-लोकांची दुसरी काही नित्याच्या उपयोगाची लिपी आहे याची कोणालाही कल्पना नाही. अशी परिस्थिती असल्यामुळे सिंधुलिपी म्हटली की सिंधुमुद्रातील चिन्ह गुंफणाचाच विचार प्रामुख्याने नजरेसमोर येतो. आता-पावेतो ज्या लोकांनी सिंधुलिपी वाचण्याचा प्रयत्न केला त्यांनी सिंधुमुद्राच वाचण्याचा प्रयत्न केला, कारण सिंधुमुद्रांखेरीज सिंधुलोकांची काही वेगळी लिपी आहे याचे त्याना बिलकूल ज्ञान नव्हते. सर जॉन मार्शलच्या मोहेंजोदारो संबंधाच्या ग्रंथात सिंधुलिपीबद्दल लिहिणाऱ्या प्रो. लँगडनचीही तीच परिस्थिती होती. प्रो. लँगडनला सिंधुमुद्रातील लिपी व ब्राह्मी लिपीतील काही अक्षरे समान दिसली व त्या दोन लिपीतील दुवे दाखविणारी लिपी उत्खननात उपलब्ध झाल्यास सिंधुमुद्रा वाचता येतील अशी त्याची अपेक्षा होती. त्यासंबंधी त्याचे म्हणणे असे: ' But the epigraphical material may be found and the evolution of the old Pictographic writing into the late Indian alphabets will be traced. If the excavations in Indus valley supply us with inscriptions which contain conventive sentences and not more proper names and titles, perhaps the key to interpretation of this script may be discovered.''

जी लिपी उत्खननात उपलब्ध व्हावी अशी लँगड-नची अपेक्षा होती ती उत्खननात अगोदरच उपलब्ध झाली होती याची लँगडनला जाणीव नव्हती. मोहेंजो-दारो ग्रंथ १ मध्ये रंगीत मातीच्या-भांड्यासंबंधी लिहिणाऱ्या अर्नेस्ट मॅकेलाही त्याची जाणीव असलेली दिसत नाही. सर जॉन मार्शलच्या मोहेंजोदारो संबंधीच्या पहिल्या ग्रंथात १७ वा परिच्छेद 'Painted Pottery' अर्नेस्ट मॅकेचा आहे. त्यात त्याने ज्यावर महत्वाचे पाच लेख आहेत अशा पाच रांजणाच्या तुकड्यांचा उल्लेख केला आहे. त्यांच्या-वरील लेखाची चित्रे मोहेंजोदारोसंबंधी ग्रंथ नं. ३ मध्ये प्लेट नं. ७८ मध्ये १ व ३ व प्लेट नं ९५ मधील ५५८ ते ५६० मध्ये आहेत. मॅकेचे म्हणणे हे रांजण अथवा रांजणांचे तुकडे प्लेट नं ८०, १ ते ८ मध्ये दर्शविलेल्या दुसऱ्या प्रकारातील मातीच्या भांड्यापैकी आहेत. त्यावरील लेखासंबंधी मॅकेने काहीही विचार केला असल्याचे दिसत नाही, कारण त्याला एका विवक्षित प्रकारच्या मातीच्या-भांड्याबद्दल म्हणजे 'Painted Pottery' बद्दल लिहावयाचे होते. या लेखाना ग्रंथ नं १ मध्ये 'Brahmi Inscriptions' असा मथळा दिला आहे. तो लेखासंबंधी अथवा त्यांच्या लिपी संबंधी काहीही विचार न करता लेखातील शब्द चित्रासारखे दिसत नसून काही अक्षरे ब्राह्मी अक्षरासारखी दिसतात एवढ्यावरूनच अंदाजाने दिलेला असावा असे दिसते.

## रांजणांचे तुकडे सिंधु अवशेष आहेत काय ?

वरील रांजणांच्या तुकड्यावरील लेखांचा आणि लिपीचा विचार करण्यापूर्वी ते सिंधु अवशेष आहेत

अथवा नाही याचा प्रथम विचार केला पाहिजे. उत्खननाच्या कोणत्या स्तरात ते उपलब्ध झाले अथवा त्यांचा काळ कोणता ह्याचे ज्ञान आपणास नाही. उत्खननाशी व त्यातील मातीच्या भांड्याशी संबंधित असलेल्या अर्नेस्ट मॅके याच्या मताप्रमाणे हे अवशेष सिंधुउत्खननातील मातीच्या भांड्याच्या दुसऱ्या प्रकारांत पडतात. हे मॅकेचे मत त्यावरील लिपीचे स्वरूप निश्चित झाल्यानंतर पक्के होईल. हे रांजणांचे तुकडे सिंधु उत्खननात इतर सिंधु अवशेषाबरोबर सापडले त्या अवशेषांचा जो काळ तोच काळ त्यांच्या बरोबर सापडलेल्या रांजणांच्या तुकड्यांचाही मानावा लागेल ह्या अवशेषावरून सिंधुसंस्कृतीच्या काळाबद्दल आपण अन्यत्र विस्ताराने लिहिले आहे. तोच काळ या राजणांच्या तुकड्यांचा आहे असे मानणे क्रमप्राप्त आहे.

## रांजणांच्या तुकड्यावरील लिपीचे स्वरूप

राजणांच्या तुकड्यावरील लिपीचे मुद्रातील चिन्हगुंफणाच्या चित्रासारख्या दिसणाऱ्या लिपीशी साम्य नाही. मुद्रातील चिन्हे वेगवेगळी अक्षरे नसून ती लोकांना कळू नये म्हणून मूळ अक्षरांची केलेली गुंफण होय. अर्थातच गुंफणीचे त्यातील कोणत्याही एका अक्षराशी साम्य असणे संभवत नाही. रांजणांच्या तुकड्यावरील लिपीत वेगवेगळी अक्षरे आहेत, अक्षरगुंफण नाही, म्हणून ती मुद्रातील अक्षरगुंफणीपेक्षा वेगळी दिसते. असे असले तरी ज्या मूळ अक्षरांच्या चिन्हगुंफणी केल्या आहेत त्या मूळ अक्षरांशी रांजणावरील अक्षरांचे साम्य आहे. त्यांचे ब्राह्मी लिपीतील व भारतातील प्रादेशिक लिपीतील अक्षराशीही साम्य आहे. देवनागरीशी हे साम्य विशेष आहे. एवढेच नव्हे तर रोमन आणि परशिअन लिपीतील अक्षराशीही त्याचे साम्य आहे. कदाचित् ह्या लिपीतूनच ब्राह्मी भारतातील प्रादेशिक लिपी रोमन आणि परशिअन लिपी विकसित झाल्या असाव्या.

## रांजणांच्या तुकड्यावरील लिपी ब्राह्मी नाही

सरजॉन मार्शलच्या मोहेंजोदारो संबंधी ग्रंथ नं. ३ मध्ये रांजणावरील लेखाना ' Brahmi Inscriptions ' असा मथळा दिला आहे. मॅके अथवा इतर ज्या कोणी हा मथळा दिला असेल तो या लिपीचे मुद्रातील अक्षरगुंफणाच्या चित्रासारख्या दिसणाऱ्या लिपीशी साम्य नाही व ब्राह्मी अक्षरांशी काहीसे साम्य आहे हे पाहून अंदाजाने दिला असावा असे दिसते. वास्तविक ही ब्राह्मी लिपी नसून जिच्यातून ब्राह्मी व देवनागरीसुद्धा भारतातील प्रादेशिक लिपी निर्माण झाल्या त्यांची जननी सिंधुलोकांची नित्याच्या उपयोगाची लिपी आहे.

रांजणाच्या तुकड्यावरील लिपीचे ब्राह्मी अक्षरांशी काहीसे साम्य असले तरी त्यांच्यात काही मूलभूत फरक आहेत. ह्या लिपीच्या आणि ब्राह्मीच्या लेखनाच्या दिशा परस्परविरुद्ध आहेत. सिंधु लिपी परशिअन आणि उर्दू लिपीप्रमाणे लेखकाच्या उजवीकडून डावीकडे लिहिली जाते. सिंधुमुद्रातील अक्षरगुंफणही या लिपीप्रमाणे लेखकाच्या उजवीकडून डावीकडेच लिहिली जाते.

ब्राह्मी लिपीत आपण लिहितो त्याप्रमाणे शब्द एकापुढे एक ठेवण्याचे नियम पक्के झाले होते. सिंधुलिपी फार प्राचीन असल्यामुळे जरी सामान्यतः शब्द उजवीकडून डावीकडे एकापुढे एक ठेवले जात होते तरी कधीकधी ते एकाच्या डोक्यावर एक असे लिहिले जात होते.

याशिवाय ही लिपी सिंधुलिपीच आहे हे दाखविणारा निश्चित पुरावा आहे तो असा. सिंधुमुद्रावर सामान्यपणे नेहमी दिसणारे बैलाचे चित्र या पैकीही एका लेखावर आहे. सिंधुमुद्रातील अक्षरांशी, लेखनपद्धतीशी, व वृषभांकित असण्याबाबत या लिपीचे मुद्रांशी साम्य आहे. त्या दोहोत जो फरक दिसतो तो एक चित्रासारखी दिसणारी अक्षर–गुंफण व दुसरी साधी नेहमीच्या लेखनाची अक्षरे, म्हणून दिसतो हे आपण पाहिलेच आहे. चिन्ह–गुंफण आपले हेतु गुप्त राखण्यासाठी चित्रासारख्या दिसणाऱ्या मूळ अक्षरांची गुंफण करून बनविलेल्या आकृती होत. ती अक्षरे नव्हत याची कल्पना आतापावेतो कोणासही नाही. ही लिपी ब्राह्मी नसून नित्याच्या उपयोगाची फार महत्वाची सिंधुलिपी आहे हे वरील सर्व कारणांवरून दिसून येईल.

## ब्राह्मीचे उगम याच लिपीत आहेत

अशोकाच्या शिलास्तंभात दिसणारी ' ब्राह्मी ' म्हणून ओळखली जाणारी लिपी आर्यांची आहे. असा












सामान्यतः असलेला समज बरोबर नाही. प्रो. लँगडनचाही तसाच समज आहे. परंतु ब्राह्मी लिपीचे या लिपीशी फार साम्य आहे. ब्राह्मी लिपी याच लिपीतून विकसित झाली आहे. सिंधुलोक आर्यांचे शत्रू होते. सिंधु लोकांचा आणि पुढील काळातील बुद्ध आणि जैन यांचा घनिष्ट संबंध असल्याचे आपण अन्यत्र दाखविले आहे. ब्राह्मी प्रथमतः बुद्धांकडूनच उपलब्ध झाली आहे. सिंधुलिपी आर्यांच्या शत्रूंची असून ब्राह्मी लिपी तिचेचे विकसित रूप आहे.

## सिंधुमुद्रात नित्याच्या उपयोगाची लिपी नाही.

सिंधुमुद्रात सिंधुलोकांची नित्याच्या उपयोगाची लिपी नाही. ती इतरांना कळू नये म्हणून मूळ चिन्हांची चित्रासारखी दिसणारी सांकेतिक लिपी आहे. त्यात नावांबद्दलचे करार असून ते इतरांपासून गुप्त ठेवण्यासाठी ही योजना आहे असे दिसते. मूळ चिन्हांची एखाद्या चित्राप्रमाणे दिसणारी व कोणालाही न कळणारी गुंफण करून नावांचे करार गुप्त राखणे हेच मुद्रांचे प्रयोजन आहे आणि त्यातच सिंधु लोकांचे चातुर्य आहे. सिंधुमुद्रा मूळ चिन्हांची गुंफण आहे याची कल्पना आतापावेतो कोणालाही नाही. ती काही तरी चित्रलिपी असावी असाच सर्वांचा समज आहे. एकट्या हराप्पा साईत मॅनुअलमध्ये ४५० वेगवेगळया चिन्हांची नोंद असल्याचे आपण पाहिले. इतकी वेगवेगळी अक्षरे जगातील कोणत्याही लिपीत असण्याची शक्यता नाही.

दुसरी लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी आहे की मूळ चिन्हे जरी सारखी असली आणि त्यापैकी काहीतील करार जरी सारखे असले तरी एक मुद्रा तंतोतंत दुसऱ्या मुद्रेसारखी नाही. मुद्रा एकमेकीपासून वेगळ्या राखणे हा त्याच्या मुळाशी उद्देश असावा असे दिसते.

सिंधु मुद्रा सिंधुलोकांची नित्याच्या उपयोगाची लिपी नाही म्हणण्याचे मुख्य कारण जगात कोणताही समाज नित्याच्या उपयोगाची लिपी लिहीत असताना अक्षरांची चित्रगुंफण करीत बसेल हे अशक्य आहे. काही विवक्षित हेतुशिवाय अशा प्रकारची चित्रगुंफण अशक्य-प्राय आहे. तो हेतु काय असावा हे आपण वर पाहिले आहे. अशा प्रकारची कोणाला कळू नये म्हणून अक्षरे गुंफून बनविलेली चित्रे नित्याच्या उपयोगाची लिपी असू शकत नाही. चिन्हगुंफण फोडून चिन्हे वेगळी करून कशी वाचावी हे आपण पुढे पाहू.

सिंधु लोकांची नित्याच्या उपयोगाची लिपी राजणांच्या तुकड्यावर उपलब्ध झाली आहे. ती नित्याच्या उपयोगाची लिपी होती याबद्दल लेखांचे वाचन केल्यावर बिलकूल संशय राहणार नाही. रांजणांच्या तुकड्यावरील लेख वाचल्यानंतर आपणास कळेल की वरजलाला सरणलाला या गृहस्थाने पाणपोईत राजणांची व्यवस्था केली होती व त्यातील पाणी वैशाख अमावस्येला प्यावे अशी सूचना केली आहे. एका राजणाच्या तुकड्यावर जालीली म्हणजे पाणपोई असा लेख आहे. वरील सर्व लेख नित्याच्या उपयोगाच्या गोष्टी आहेत. त्यात सर्वांना कळावा या उद्देशाने लिहिलेला पाणपोई हा लेख आहे. पाण्यासाठी रांजणाची व्यवस्था करणाराचे नाव आहे. असे नाव लिहिताना आपल्या सत्कार्याबद्दल लोकाना माहिती व्हावी हाच एकमेव उद्देश असतो. पाणी वैशाख अमावस्येला प्यावे ही सर्वांना कळावी अशी सूचना आहे. यात कोणतीही गोष्ट गुप्त राखण्याचा हेतु नाही उलट ती सर्वांना माहीत व्हावी असा उद्देश आहे. यात चित्रासारखी शब्दगुंफण नाही. ती सिंधु लोकांची साधीसुधी अक्षरांची नित्याच्या उपयोगाची लिपी आहे. ती जगातील महत्त्वाच्या लिपींची जननी फार प्राचीन आणि महत्त्वाची लिपी आहे.

## भाषेबद्दल अपसमज

या अपसमजापैकी सर्वात महत्त्वाचा अपसमज भाषेसंबंधी होय. भारतात प्रादेशिक भाषासंबंधी असा अपसमज प्रचलित आहे की मूळ भाषा संस्कृत तिच्यातून निरनिराळया प्राकृत झाल्या व प्राकृतातून भारतात अस्तित्वात असलेल्या बोलभाषा निघाल्या. हा अपसमज दुसऱ्या जास्त दृढ असलेल्या अपसमजावर अवलंबून आहे. तो आर्य भारतात येण्यापूर्वी तेथे नाव घेण्यासारखी कोणतीही संस्कृती व भाषा नव्हती हा होय. आर्यांची भाषा संस्कृत असल्यामुळे व तीच प्रथम भाषा आहे असा समज असल्यामुळे तिच्यातूनच भारतातील देशी भाषा








निर्माण झाल्या असे चुकीचे समज निर्माण झाले. हे समज चुकीचे आणि विकृत आहेत हे दाखविण्यासाठी वेगळे लिहिले आहे. लिपीचे वाचन करण्यापूर्वी येथे एवढेच सांगून ठेवावयाचे आहे कीं आर्यापूर्वी भारतात सिंधुसंस्कृती नावाची श्रेष्ठ संस्कृती अस्तित्वात होती. सिंधुलोकांची भाषा मूळ बोलभाषा जिच्यातून संस्कृत, प्राकृत व भारतातील बोलभाषा निर्माण झाल्या ती अथवा तिच्यातून उत्पन्न झालेली प्रादेशिक भाषा असावी. ती, संस्कृत हल्ली अस्तित्वात असलेल्या संस्कृतशी सादृश्य दाखविणाऱ्या चार प्राकृत अथवा पाली यापैकी कोणतीही नसावी. भारतातील प्रादेशिक भाषा भारतात संस्कृतपेक्षा जास्त जुन्या आहेत. तशी एखादी भाषा वाचनातून उपलब्ध झाल्यास निष्कारण गैरसमज निर्माण होऊ नये म्हणून मुद्दाम लिहिले आहे. आपल्या लिपीच्या वाचनाच्या पद्धतीत भाषा माहीत असण्याचा मुळीच प्रश्न नाही. आपणास सिंधु-लेखातील भाषेचे मुळीच ज्ञान नाही. वाचनातून जी निघेल ती त्यांची भाषा. इतका प्राथमिक विचार करून आता रांजणांच्या तुकड्यावर उपलब्ध झालेली सिंधुमुद्रापेक्षा वेगळी सिंधुलोकांची नित्याच्या उपयोगाची लिपी वाचण्यास सुरवात करू.

**रांजणाच्या तुकड्यावरील लेख**

Pot-shred

PL. LXXVIII

नं. १



Brahmi Inscriptions

PL. XCV

नं. १

नं. २

नं. ३

नं. ४

हे रांजणांच्या तुकड्यावरील पाच लेख आहेत. मुद्रांचे या लेखांशी काहीही साम्य नाही. मॅकने त्याचे वर्णन जे केले ते असे : " Five fragments of Jars bear seal impressions ( PL LXXIII 1 and 3 and PL XCV 558–60 ) in two cases upon shoulders close to the neck of jar and in two cases to the base. In one case the position of the impression can not be determined. All these jars or fragments of jars, belong to the second type of pottery illustrated in PL LXXX 1–8.

Two of the impressions are the same ( one of them is shown in PL LXXVIII ) but they were not made by the same seal; for in one there are only characters, where as the other shows the figure of the bull also. The other three impressions are composed of characters only. It is possible that these seal

impressions are also potters marks, for they were impressed before the jars were baked. That they were not intended to mark temple or sacred Pottery seems to be implied by the inscriptions being different in three cases."

वरील पाच लेखांपैकी पहिला आणि दुसऱ्यातील तिसरा हे लेख एकच आहेत परंतु वर मॅकेने म्हटल्याप्रमाणे त्यापैकी एकावर अक्षराखेरीज वृषभाची आकृतीही आहे. वृषभाच्या आकृतीमुळे हे लेख सिंधुलेख आहेत याबद्दल कोणताही संशय उरत नाही. यातील अक्षरांचे सिंधुमुद्रातील चिन्हे, ब्राह्मी अक्षरे व भारतातील प्रादेशिक लिपीतील अक्षरांशी साम्य आहे. म्हणजे ही लिपी भारतात सातत्याने चालत आहे. या लिपीचे परशिअन आणि रोमन अक्षरांशीही साम्य आहे.

**अडचणी**

ही लिपी वाचणे सिंधुमुद्रा वाचण्यापेक्षा सोपे आहे कारण वर पाहिल्याप्रमाणे सिंधुमुद्रा चिन्हांची गुंफण आहे आणि ही लिपी साधी अक्षरे आहेत. या लिपीत वेगवेगळी अक्षरे असल्यामुळे चिन्ह–गुंफण फोडून अक्षरे वेगळी करण्याचे कठीण काम येथे नाही. असे असले तरी वरील लेखांची भाषा आणि लिपी दोन्हीही आपल्या ओळखीच्या नसल्यामुळे वरील लेख अनोळखी निरर्थकचिन्हसमूह म्हणून आपल्यापुढे उभे आहेत. त्यांचे वाचन करण्यास मदत होईल असे काहीही साधन आपणाजवळ नाही. मॅकेने वरील उताऱ्यात ती कदाचित कुम्भाराची चिन्हे ( Potter's marks ) असतील असा संशय व्यक्त केला आहे. याचा अर्थ असा की ही लिपी असावी अथवा नाही याचाही मॅकेला संशयच आहे. त्यावर ब्राह्मी लेख असा मथळा दिला तोही अज्ञातलाच प्रकार. ही लिपी ब्राह्मी नाही हे आपण पाहिले. अशा परिस्थितीत आपणास हे लेख वाचावयाचे आहेत. त्यासाठी शिलालेख, ताम्रपट अथवा प्राचीन ऐतिहासिक लेख वाचण्याची कोणतीही पद्धति उपयुक्त होऊ शकत नाही. ऐतिहासिक पद्धतीत लिपी आणि भाषा दोन्हीही अथवा त्यापैकी एक माहीत असते व निश्चित अंदाज करण्यास जागा असते तसे येथे काहीच नाही.

**भाषा माहीत नसताना लेख वाचण्याची आपली पद्धति**

आपणास वरील लेखांची लिपी अथवा भाषा माहीत नाही. वरील लेख अनोळखी शब्दसमुच्चय आपल्या पुढे उभा आहे. त्यांची भाषा अथवा अक्षरांचे उच्चार माहीत नाही. एखादे अक्षर वाचणे म्हणजे ते अक्षर ज्या ध्वनीचे चित्र असेल त्या ध्वनीचा उच्चार करणे होय. आपणास चित्र दिसते परंतु ते कोणत्या उच्चाराचे चित्र आहे हे माहीत नाही. आणि ते ज्याला माहीत आहे असाही कोणी नाही. अशा परिस्थितीत या अक्षरांना बरोबर नवीन उच्चार देणे अथवा त्यांचे उच्चार अचूक ओळखून काढणे याशिवाय दुसरा मार्ग नाही. वरील दोन्हीही क्रिया एकच आहेत आणि दोहोंचाही अर्थ एवढाच की अक्षरांच्या उच्चाराबद्दल बरोबर तर्क करणे. आपण अक्षरांच्या आकारास दिलेले उच्चार तेव्हाच बरोबर म्हणता येतील की एका आकारास दिलेला उच्चार तशा प्रकारच्या सर्व आकारास सारखाच लागू पडेल आणि त्यातून अर्थवाही शब्द आणि भाषा निघेल. ही झाली दिलेले ध्वनी बरोबर अथवा नाही हे पाहाण्याची गोष्ट. परंतु मुळात अक्षरांना ध्वनी कसे द्यावे अथवा त्यांचे ध्वनी कसे शोधून काढावे हाच महत्वाचा प्रश्न आहे.

**गृहीत प्रमेय**

वरील लेखातील अक्षरांचे उच्चार शोधून काढण्यासाठी ज्ञात लिपीतील समान उच्चाराची अक्षरे एकापुढे एक मांडली असता आश्चर्य वाटणारी एक महत्त्वाची गोष्ट आढळून आली ती अशी की वेगवेगळ्या स्टाकच्या म्हणून समजल्या जाणाऱ्या जगातील महत्त्वाच्या लिपीतील समान उच्चाराच्या अक्षरांचे आकार समान आहेत. उदाहरणार्थ **प** हे अक्षर घेऊन त्याचे जगातील महत्त्वाच्या ब्राह्मी, देवनागरी-परशिअन आणि रोमन या लिपीतील समान उच्चाराच्या अक्षराशी तुलना करू :

| ब्राह्मी | देवनागरी | परशिअन | रोमन |
|---|---|---|---|
| b | प | پ | P |

अक्षरांची तुलना करताना काही महत्वाच्या गोष्टी माहीत असावयास पाहिजेत. देवनागरी अक्षरातील



अनुक्रमणिका






शेवटची अची उभी रेघ काढून टाकावयाची असते असे केले असता देवनागरी प चा आकार ‿ असा होतो. परशिअन पे तील ए ची खालची तीन टिंबे काढून टाकावयाची असतात. तसे केले असता परशिअन प चा आकार ( असा होतो. रोमन पी मधील इची मागची रेघ काढून टाकावयाची असते. ती काढून टाकली असता रोमन प चा आकार ⊃ असा होतो. अक्षरांच्या आकृतींची तुलना करताना व त्यांचे साम्य पाहताना त्या कशा ठेवल्या आहेत हा प्रश्न महत्वाचा नाही. त्यांचे आकार समान आहेत अथवा नाही ही गोष्ट महत्त्वाची आहे. आता हे दिसेल की ब्राह्मी, देवनागरी, परशिअन आणि रोमन या सर्व लिपीतील प या ध्वनीचे आकार समान आहेत. त्यात रोमन प आडवा ठेवला आहे. सिंधु लेख वाचताना अक्षरे वेगवेगळया पद्धतीने ठेवलेली आढळतील. आता आपणाला हे निश्चित कळेल की प या ध्वनीचा आकार ‿ असा आहे. याचा अर्थ मूळ लिपीत प या ध्वनीला U असे चिन्ह आहे. यावरून एक गोष्ट आढळून आली की भाषा जरी वेगवेगळया असल्या तरी त्यातील मूलभूत उच्चार थोडे आणि समान आहेत. ज्यापासून अक्षरे निर्माण होतात असे ध्वनी ( articulate sounds ) फार थोडे आणि सर्व भाषात समान आहेत. निरनिराळया लिपीतील मुळाक्षरांची तुलना करून पाहिली तर ही गोष्ट ताबडतोब लक्षात येईल. ज्यापासून अक्षरे निर्माण होतील असे मानव जे ध्वनी काढतो ते समान आणि मर्यादित आहेत. पाणिनीने तोंडाच्या विशेषतः वाचेच्या प्रयत्नावरून ( आस्यप्रयत्न ) या ध्वनींचे वर्गीकरण केले आहे. पूर्वी हजारो वर्षे मानवाला ही गोष्ट कळून चुकली होती की पशु पक्षी जसे विवक्षित ध्वनी काढतात तसा मानवही विवक्षितच ध्वनी काढू शकतो. त्याचीही ध्वनी काढण्याची क्षमता मर्यादितच आहे. त्याचे ध्वनी इतरांपेक्षा जास्त आणि स्पष्ट असतात एवढेच. आपल्या मुळाक्षरावरून आपण किती प्रकारचे अक्षर निर्माण करणारे ध्वनी काढू शकतो याची कल्पना येईल. ते फार मर्यादित आहेत. याची कल्पना लिपी निर्माण करणाऱ्या मानवास होती. ही कल्पना असली म्हणजे लिपी बनविणे फार सोपे काम झाले. जे निरनिराळे मूलभूत ध्वनी आहेत त्या प्रत्येकासाठी विवक्षित चिन्ह बनविले की लिपी तयार होते. आणि एकदा अशी लिपी तयार झाली की कोणत्याही भाषेतील ध्वनी टिपून घेता येतात. याचा अर्थ असा की एकच लिपी भिन्न भाषिकांच्या उपयोगी पडते. ती जगभर पसरू शकते आणि तशी ती पसरली व आज ज्या वेगळाल्या लिपी दिसतात त्या मुळात एकाच लिपीतून निघाल्या हे दिसून येईल. यावरून मूळ चिन्ह अथवा त्यातून विकसित झालेल्या चिन्हांचा ध्वनी कळू शकतो व आपण ते वाचू शकतो.

जगातील लिपी वेगवेगळया वंशाच्या ( stock ) असून त्या वेगवेगळया ठिकाणी निर्माण झाल्या हा लिपीबद्दलचा समज अगदी चुकीचा आहे हे वरील विवेचनावरून दिसून येईल. वरील विवेचनावरून लिपी एकाच ठिकाणी निर्माण झाली व ती वेगवेगळया ठिकाणी नेण्यात आली हे दिसून येईल. आतापावेतो जगातील सर्वात जुने लिखाण सिंधुमुद्रा व सिंधुलिपी भारतातच उपलब्ध झाली व प्रथम लिपी भारतातच निर्माण होऊन जगभर पसरली असे मानण्यास फार सबळ पुरावा आहे. भारतात ती सातत्याने मूळ स्वरूपात कायम आहे.

जगातील महत्वाच्या लिपी व तिचे स्वरूप कसे आहे याची काहीशी कल्पना वर प ध्वनीचे उदाहरण घेऊन दिली आहे. प ध्वनीचे मूळ चिन्ह U असे. सिंधु लिपीत या आकाराचे जे चिन्ह आहे त्याचा प हा ध्वनी निर्धारित होतो. आपला सिद्धांत वरील चार लिपी पुरताच मर्यादित आहे असे समजू नये. जगातील महत्वाच्या चार लिपी आपले गृहीत प्रमेय सिद्ध करण्यासाठी घेतल्या आहेत. हा नियम फार प्राचीन समजल्या जाणाऱ्या झेंद, हिब्रू व खरोष्ठी लिपीस सारखाच लागू पडतो. त्यात प या ध्वनीच्या आकृती अनुक्रमे ╟ ט ɔ D अशा आहेत. झेंद आणि हिब्रू चिन्हांचा उच्चार पे आहे व त्यात अनुक्रमे > – ही चिन्हे वगळावयास पाहिजेत. वरील लेखातील प्रत्येक अक्षराला हा नियम लावून त्यांचे उच्चार निर्धारित करू. हिब्रु भाषेत प चा उच्चार प आणि फ मधला आहे.

त्यापूर्वी, वर दर्शविल्याप्रमाणे मानवाच्या मूलभूत ध्वनीची एकदा कल्पना आली की त्याना चिन्हे देऊन








## नित्याच्या उपयोगाची सिंधुलिपी व तिचे वाचन

लिपी कशी बनविता येते व सिंधुलोकांनी ती कशी बनविली असावी याचा थोडासा विचार करून आपण वरील लेखाच्या वाचनास सुरवात करू. तर्काच्या दोन पद्धती आहेत. आहे त्या परिस्थितीवरून मूळ काय असेल याचा शोध करणे ही एक पद्धती व मूळ परिस्थितीतून हल्लीची परिस्थिती शोधून काढणे ही दुसरी पद्धती. आतापावेतो आपण पहिल्या पद्धतीने विचार केला व वरील लेखांचे वाचन करताना पुढेही करू. त्यापूर्वी थोडा दुसऱ्या पद्धतीने विचार करून प्रथम लिपी कशी निर्माण झाली असावी व प्रचलित लिपी तिच्यातून कशा निर्माण झाल्या असाव्या याचा विचार करू. मूलभूत उच्चारांची कल्पना असली म्हणजे त्याना चिन्ह देऊन लिपी तयार करता येते असे आपण वर म्हटले आहे. ती कशी तयार करता येते व केली असावी याचा थोडक्यात विचार करू. सिंधुलोकांचा होडीसाठी वडवा शब्द आहे. तूर्त तसा शब्द आहे असे गृहीत धरून चालू. पुढच्या लेखात मुद्रांचे वाचन करताना तो वाचून दाखवू. आता वडवा ह्या ध्वनीना कशी चिन्हे दिली असतील ते पाहू. सिंधुलिपी लेखकाच्या उजवीकडून डावीकडे लिहिली जाते, हेही तूर्त गृहीत धरून चालले पाहिजे, व या ध्वनीला ( असे चिन्ह दिले आहे. लिहिताना ते । , ) असे होते. ड ला त्याच्या उलट ( असे चिन्ह दिले आहे. शेवटचा वा व चिन्ह दोन वेळा लिहून म्हणजे )) असा झाला. आता वडवा या ध्वनीची आकृती सिंधुलिपीत )) ( ) ‹– अशी झाली. ही सिंधुमुद्रांची लिपी होय. सिंधु-मुद्रांच्या लिपीत वडवा हा शब्द वरीलप्रमाणे लिहितात. त्याची चिन्हगुंफण होते तेव्हा तो ।/)‹– असा लिहिला जातो. जगातील महत्वाच्या लिपीतील 'व' उच्चाराची सर्व अक्षरे) या मूळ सिंधुचिन्हातूनच निर्माण झाली आहेत.

### लेखांचे वाचन

वरील दोन्ही पद्धतीने मूळ लिपी सिंधुलिपी असून जगातील लिपी त्याचेच विकसित रूप आहे हे दिसेल. आता आपण वरील लेखांचे क्रमशः वाचन करू.

### पहिला लेख

सूचना– सिंधुलिपी परशिअन लिपीप्रमाणे लेखकाच्या उजवीकडून डावीकडे लिहिली जाते. हे आपण मागे पाहिलेच आहे. सर्व लेखांचे वाचन झाले म्हणजे ते आपोआप कळेल. यात पहिले अक्षर । हे आहे. त्याचा उच्चार आपणास आपल्या पद्धतीने शोधून काढावयाचा आहे. त्यासाठी त्याच्यासारख्या आकाराच्या इतर महत्वाच्या प्रचलित लिपीतील अक्षरांची तुलना करून त्याचा ध्वनी निर्धारित करू. त्यासाठी आपण जगातील अत्यंत महत्वाच्या चार लिपी घ्यावयाच्या ठरविल्या आहेत. त्या ब्राह्मी, देवनागरी, परशिअन व रोमन ह्या होते.

| सिंधु | ब्राह्मी | देवनागरी | परशिअन | रोमन |
|---|---|---|---|---|
| ) । | d | 6 | Y | 9 | V |

। या चिन्हाचे पहिल्या आणि दुसऱ्या सिंधु चिन्हाशी साम्य आहे. ब्राह्मी व सिंधु ७ च्या उलट म्हणजे 6 असा आहे. त्याचे कारण ब्राह्मी देवनागरी प्रमाणे लेखकाच्या डावीकडून उजवीकडे लिहिली जाते त्यामुळे अक्षराचे तोंड विरुद्ध दिशेला वळले. गोलपणा जास्त झाला व त्याचे साम्य तिसऱ्या सिंधु चिन्हाशी जास्त आहे. देवनागरी व तील शेवटची अ ची रेघ काढून टाकावयाची असते. उरलेली आकृती ( अशी तो तोंड वळलेला सिंधु व होय कारण देवनागरी ही ब्राह्मी सारखी सिंधुलिपीच्या उलट दिशेने लिहिली जाते. परशिअन 9 वाव हा वेगळ्या पद्धतीने ठेवलेला सिंधु d (व) च होय. अक्षरे कशी ठेवली आहेत हे महत्वाचे नसून आकार सारखा आहे अथवा नाही हे पाहणेच जास्त महत्वाचे आहे. रोमन V काहीसा भिन्न दिसतो परंतु वास्तविक तसे नाही. त्याचे सादृश्य पहिल्या दोन आकृतीशी तंतोतंत आहे. रोमन V चा विचार करताना हे लक्षात घ्यावयास पाहिजे की व्ही खरोखरीच व आणि इ या दोन अक्षरांचा झाला आहे. व त्याचा उच्चार व नसून वी असाच आहे. तोडून तो ∠ । असा होतो. लेखकाच्या उजवीकडून पहिले चिन्ह व आहे आणि दुसरे इ आहे. सिंधुलिपी वाचताना रोमन अक्षरांचा उपयोग विशेष होतो. आता हे निर्धारित होईल की इतर लिपीतील समान चिन्हांचा उच्चार व आहे त्या अर्थी ते ज्या मूळ चिन्हाच्या आकृती आहेत त्याचाही उच्चार निश्चितपणे व असावा. सिंधुमुद्रातील आणि ह्या लिपीतील व अगदी तोच आहे. इतर लिपीतही सिंधु आकृतीशी साम्य आहे. ही लिपी मुद्रातील लिपीसारखी लेखकाच्या उजवीकडून डावीकडे लिहिली जाते व दोहोतील चिन्हेही समान आहेत. यावरून ही सिंधुलिपीचा आहे हे निश्चितपणे सिद्ध होते.

[ अपूर्ण







ले. महात्मा गांधी

# सत्याचे मूळ

[ म. गांधींनी स्वतः जीवनमूल्यांसंबंधी जे विचार लेखबद्ध केले आहेत त्यातील काही मौलिक भाग गांधी शताब्दीनिमित्त पुढील सप्टेंबर १९६९ पर्यंत आम्ही क्रमाने देणार आहोत. त्यातील महात्मा गांधींनी द. आफ्रिकेत असताना जे सर्वोदयविषयक लेख लिहिले त्यातील 'सत्याचे मूळ' हा पहिला लेख आहे. गांधी वाङमय प्रकाशन समिती महाराष्ट्र यांच्या सौजन्याने– ] –संपादक

माणसांची अनेक वेळा फसगत होते. परंतु आजच्या अर्थशास्त्राच्या नियमांनी माणसांची जी दिशाभूल चालविली आहे तितकी मोठी फसगत दुसरी कोणतीही नसेल. समाजात परस्परांविषयीं जी प्रेमभावना असते तिचा प्रभाव लक्षात न घेता माणसे म्हणजे जणू यंत्रे असे गृहीत धरून हे अर्थशास्त्राचे नियम घडविले जातात. हा एक मोठा भ्रम आहे आणि त्याने माणसाला कमीपणा येतो.

इतर लोकभ्रमांत वरवर पाहता जसे सत्य असल्यासारखे भासते तसेच अर्थशास्त्राच्या नियमांच्या बाबतीतही भासते. अर्थशास्त्रज्ञ म्हणतो की, "परस्परांविषयींची प्रेमभावना ही एक आगंतुक बाब समजली पाहिजे, मनुष्यस्वभावाचे नित्याचे व सर्वसामान्य जे वळण आहे त्याला बाधा आणणारी ती मानली पाहिजे. कारण मनुष्यामध्ये असलेला लोभ आणि प्रतिष्ठेची इच्छा याच नित्याच्या गोष्टी आहेत. म्हणून जे आगंतुक आहे ते विचारात न घेता, मनुष्य म्हणजे द्रव्यार्जन करण्याचे यंत्र असे समजून, मजुरीचे आणि खरेदी-विक्रीचे नियम कसे ठेवले असता माणसापाशी जास्तीत जास्त संपत्ति जमा होऊ शकेल त्याचाच फक्त विचार करावा. अशा विचाराच्या पायावर एकदा नियम निश्चित केले म्हणजे मग नियमांत बाधा उत्पन्न करणारे हे भावनेचे तत्त्व कितपत उपयोगात आणावयाचे ते ज्याचे त्याने ठरवावे."

परस्परांविषयींच्या प्रेमभावनेचा प्रभाव हा जर व्यावहारिक नियमांच्या जातीचा असता तर वरील कोटिक्रम बरोबर म्हणता आला असता. मनुष्यामधील भावना हे आन्तरिक बळ आहे, तर देवघेवीचे नियम हा एक बाह्य लौकिक व्यवहार आहे. म्हणून दोहोंची जात एक नाही. समजा, एक वस्तु अमुक दिशेने जात आहे आणि तिच्यावर एका बाजूने तिची नित्याची गति काम करीत आहे तशीच दुसऱ्या बाजूने तिला मुद्दाम दिलेली गती काम करीत आहे, तर त्या वस्तूच्या चलनाची दिशा आपण कशी ठरवितो ? अगोदर तिची पहिली नित्याची गती काढतो, मग मुद्दाम दिलेल्या दुसऱ्या गतीचे प्रमाण काढतो आणि दोहोंच्या बेरीज-वजाबाकीने तिची आतांची गती काढतो. हे आपण का करू शकतो ? तर नित्याची गती आणि मुद्दाम दिलेली गती ही एकाच जातीची असतात आणि त्यांची बेरीज-वजाबाकी करता येते म्हणून. पण माणसांच्या व्यवहारात देवघेवीचे नित्याचे नियम आणि एकमेकांविषयींची प्रेमभावना या दोहोंची जातच भिन्न आहे. भावना माणसावर वेगळ्या प्रकारचा आणि वेगळ्या रीतीने परिणाम करतात. त्यामुळे माणसाचे स्वरूपच मुळी पालटून जाते. वस्तूवर होणाऱ्या परिणामाप्रमाणे भावनेचे परिणाम आपण बेरीज-वजाबाकीच्या नियमांनी तपासू शकत नाही. देवघेवीच्या नियमाचे ज्ञान मनुष्याच्या भावनेचा परिणाम तपासण्याच्या दृष्टीने उपयोगी पडत नाहीत.

अर्थशास्त्राचे निष्कर्ष चुकीचे आहेत असे आम्हाला म्हणायचे नाही. त्यात गृहीत धरलेल्या गोष्टी जर मान्य केल्या तर त्यांतून तेच निष्कर्ष निघणार. पण त्यात आम्हाला यत्किंचितही स्वारस्य वाटत नाही. समजा, एखाद्या व्यायामशास्त्रात असे गृहीत धरले की, माणसांना हाडेच नसतात. या गृहीतकृत्यावर असे दाखविता








येईल की कसरत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शरीरांच्या गुठळ्या केल्या, त्यांच्या थापटून पोळ्या केल्या किंवा ती शरीरे दोराप्रमाणे लांबविली तर ते लाभदायी आहे. आणि इतके साधले म्हणजे मग त्यात गैरसोयीची असलेली हाडे पुनः भरली म्हणजे झाले. हा सारा युक्तिवाद प्रशंसनीय असेल, त्याचे निष्कर्ष खरे असतील, तरी ते शास्त्र मात्र व्यवहारात निरुपयोगी आहे. आजचे अर्थशास्त्र नेमके असल्याच गृहीतकृत्यावर उभे आहे. त्यात अशी कल्पना केली आहे कीं, मनुष्याला फक्त शरीर आहे. ते त्याचा आत्मा विचारातच घेत नाही आणि मग तदनुसार ते आपले नियम बनविते. आत्मा ज्याच्यात प्रधान आहे अशा मनुष्यप्राण्याला असले नियम कसे लागू पडू शकतील बरे ?

अर्थशास्त्र हे शास्त्रच नाही. मजूर हरताळ पाडतात तेव्हा या शास्त्राचा दुबळेपणा आपल्याला समजून येतो. त्यावेळी मालक एक आग्रह धरून बसतो आणि मजूर दुसरा आग्रह धरून बसतात. अर्थशास्त्राचे कोठलेच नियम त्या दोघांना एकत्र आणू शकत नाहीत. माणसे खूप वाद घालतात. कोणी म्हणतात मालकांचा स्वार्थ मजुरांच्या स्वार्थाला विरोधी नाही, तर कोणी म्हणतात आहे. वास्तविक एकमेकांचे स्वार्थ जरी समजा विरोधी असले तरी त्यावरून माणसांनी एकमेकांच्या विरुद्धच राहिले पाहिजे असे अनुमान नेहमीच खरे ठरत नाही. घरात एकच भाकरीचा तुकडा आहे, आई आणि मुले दोघी भुकेलेली आहेत. त्यांचा स्वार्थ खाण्याच्या बाबतीतला एकमेकांला विरोधी आहे. आईने खावे तर मुले उपाशी राहतील, मुलांनी खावे तर आईला उपाशीपोटी कामाला जावे लागेल. तरी यावरून त्या दोघात विरोध किंवा वैर आहे, ती भाकरीच्या तुकड्याकरिता झगडतील आणि आई जास्त बलवान असल्यामुळे तीच तो तुकडा मटकावून टाकील असे काही ठरत नाही. ह्याच रीतीने माणसांचे स्वार्थ जरी वेगवेगळे असले तरी त्यांनी एकमेकांचे वैरच करावे आणि दुसऱ्यावर मात करण्याकरिता दांडगाई किंवा फसवणूकच करावी असे नाही.

तथापि, समजा, माणसात आणि जनावरात काही अंतर नाही, जनावरे जशी नीतीच्या प्रेरणेने कामाला प्रवृत्त होत नाहीत, तशी माणसेही त्या प्रेरणेने प्रवृत्त होत नाहीत, आपला स्वार्थ साधण्याकरिता जनावरांप्रमाणेच आपण एकमेकांशी झगडले पाहिजे असे आपण मानले, तरी मालक आणि मजूर यांचे स्वार्थ एकच असतात किंवा एक नसतातच असा काही नियम आपल्याला सांगता येणार नाही. परिस्थितीप्रमाणे ते कधी एकच असतील, कधी विरोधी होतील. उदाहरणार्थ, काम चांगले झाले पाहिजे आणि मालाला किंमत योग्य आली पाहिजे हे दोघांच्याही हिताचे आहे, हे उघड आहे; परंतु नफ्याची वाटणी होतांना एकाचा लाभ ती दुसऱ्याची हानी असे होईल किंवा होणारही नाही. मजूर नेहमी रोगट आणि निरुत्साही राहतील इतका कमी पगार त्यांना देण्यात जसा मालकांचा स्वार्थ साधण्याजोगा नाही, तसेच जास्त पगार घेतल्याने कारखाना निर्धास्तपणे व चांगल्या रीतीने चालणे शक्य होणार नाही असे असेल तर जास्त पगार मागण्यात मजुरांचाही स्वार्थ नाही.

म्हणून व्यवहाराच्या धोरणातून आपण काही शास्त्र काढू म्हटले तर तो प्रयत्न व्यर्थ आहे. पैशाच्या नफा-नुकसानीच्या धोरणावर माणसांचे व्यवहार चालावेत असा ईश्वराचा हेतु नाही, ते न्यायावर चालले पाहिजेत म्हणजेच माणसाने नीतीने आपले काम साधायचे की अनीतीने ते केवळ तात्पुरता लाभ पाहून ठरविण्याचा विचार सोडून दिला पाहिजे. अमुक रीतीने वागले असता त्याचा अंती परिणाम काय होईल हे काही कोणी आगाऊ सांगू शकत नाही. पण अमुक वागणूक न्यायाची आहे की अन्यायाची हे बहुतकरून प्रत्येकजण जाणू शकतो आणि न्यायाचे परिणाम शेवटी स्वतःला आणि इतरांना उत्तमच ठरणार हेसुद्धा आपणाला कळू शकते. अर्थात् उत्तम म्हणजे कसे आणि कोणत्या रीतीने हे आपल्याला सांगता येणार नाही.

'न्याया'च्या कल्पनेत एकमेकांविषयीची प्रेमभावनाही मी गृहीत धरली आहे – प्रेमभावना, जी









आम्हा एकमेकांत लागते. मालक आणि कामगार यांच्यामधील रास्त संबंध शेवटी याच भावनेवर अवलंबून असले पाहिजेत.

उदाहरण म्हणून आपण घरगुती काम करणारे नोकर घेऊ. घरधनी आपल्या नोकराकडून जास्तीत जास्त काम घेऊ इच्छितो, त्यांना तो घडीची फुरसत देत नाही, पगार कमी देतो, त्यांना तळघरासारख्या कोंदट जागेत ठेवतो, थोडक्यात म्हणजे तो नोकरांचे देह आणि प्राण एकमेकांना धरून राहतील एवढेच त्यांना वेतन देतो, असे आपण समजू या. असे करण्यात ज्याला 'न्याय' म्हणतात त्याचा आपल्याकडून तो भंग करीत नाही. नोकराने अमुक पगारावर आपला सगळा वेळ मालकाला देण्याचा करार केला आहे आणि मालक तो वेळ घेत आहे. काम किती कडकपणे घ्यायचे याची मर्यादा तो आपल्यासारख्याच इतर मालकांची वागणूक पाहून ठरवितो. नोकराला दुसरीकडे जास्त पगार मिळत असेल तर ती नोकरी पत्करण्याची त्याला मुभा असते.

यालाच देवघेवीचे नियम बनविणारे पंडित 'अर्थशास्त्र' म्हणतात, आणि ते सांगतात की, अशा रीतीने होईल तितके जास्त काम कमीत कमी पैशात करवून घेण्याने मालकाला लाभ होतो, साऱ्या समाजाला तो लाभ मिळतो आणि त्यायोगे परत शेवटी नोकरालाही लाभ होतो.

परंतु ही गोष्ट खरी नाही. नोकर हा जर जड यंत्र असता तर तसे घडले असते. यंत्राला चालविणारी शक्ती वाफ, वीज किंवा अशीच काही मापता येण्याजोगी वस्तु असते. पण येथे नोकराला चालविणारी शक्ती त्याचा आत्मा ही आहे आणि आत्म्याचे बळ असे आहे की, ते अर्थशास्त्रज्ञांच्या सगळ्या नियमांना उलटे-पालटे करून टाकून त्यांना खोटे ठरविते. मनुष्यरूपी यंत्रात पैसारूपी कोळसा भरण्याने काही जास्तीत जास्त काम घेता येईल असे नाही. त्याच्या हातून चांगले काम, जेव्हा त्याच्यात प्रेमभावना– आपुलकी जागी करण्यात येईल, तेव्हाच होईल. मालक-नोकर यांच्या मधले संबंध पैशाचे नव्हेत, तर प्रेमाचे असले पाहिजेत.

पुष्कळ वेळा असेही घडून येते की, मालक जेव्हा कुशल आणि उत्साही असतो तेव्हा पुष्कळसे काम दडपणाने होण्याचा संभव असतो. आणि असेही घडते की, मालक, आळशी आणि मेंगळट असला की नोकराकडून पाहिजे तितके आणि पाहिजे तसे चांगले काम होत नाही. परंतु नियम मात्र खरोखर असा आहे की कुशलतेत आणि हिंमतीत सारखे असे दोन मालक घेतले आणि तसेच नोकर घेतले तर प्रेमाने काम करून घेणाऱ्या मालकाचा नोकर प्रेम नसलेल्या मालकाच्या नोकरापेक्षा जास्त आणि अधिक चांगले काम करतो.

नोकरांचे लाड केले असता ते त्याचा दुरुपयोग करतात, ममतेचा मोबदला पुष्कळ वेळा कृतघ्नपणाने मिळतो असे जरी असले तरी वरील नियमाची सत्यता त्यामुळे यत्किंचितही कमी होत नाही. कारण, ममतेने वागविले असता जो नोकर कृतघ्नपणा दाखवितो त्याला कडकपणे वागविले तर तो वैरी बनेल; आणि उदार मनाच्या मालकाशीही जो नोकर बेइमान होईल तो अन्यायी मालकाचा घातच करील.

म्हणून कोणत्याही बाबतीत आणि कोणत्याही माणसाशी निःस्वार्थ वागणूक ठेवण्याचा परिणाम चांगलाच निष्पन्न होईल. येथे प्रेमभावनेचा विचार आपण माणसांना कार्याला प्रवृत्त करणारी शक्ती या स्वरूपात करीत आहो, प्रेम असणे हे नेहमी चांगले, इष्ट आहे अशा सर्वसाधारण स्वरूपात करीत नाही. येथे एवढेच दाखवायचे आहे की, प्रेमभावना ही एक नियमाच्या पलिकडची शक्ती आहे, अर्थशास्त्रज्ञांचे सारे नियम आणि अंदाज ती लटके ठरविते. दुसरा कोणताही आर्थिक हेतु आणि शर्त मनात नसेल तरच प्रेमभावना ही खरी कार्यप्रेरक शक्ती बनते. जर मालक तोलून मापून हिशेब करू लागला आणि बदला मिळण्याच्या अपेक्षेनेच नोकरावर प्रेम दाखवू लागला तर त्याची निराशा होण्याचा संभव आहे. प्रेम हे प्रेमाकरिताच केले, आर्थिक लाभांचा लोभ त्यात ठेवला नाही तर आर्थिक लाभ आपोआपच चालून येतील. ' जो आपला जीव संभाळू पाहील तो तो गमावील, जो आपला








जीव वेचेल त्याला तो गवसेल ' ही म्हण येथेही लागू आहे.

आता आणखी एक उदाहरण फौज आणि तिचा सेनापति यांचे घेऊ. जर कोणी सेनापती आपला त्रास वाचविण्यासाठी म्हणून केवळ शिस्तीच्या नियमांनी फौजेला प्रभावशाली करू पाहील तर त्याच्या अपेक्षेप्रमाणे शिपायांच्याकडून काम होणार नाही. परंतु, जर तो त्यांच्याशी जिव्हाळ्याचे संबंध ठेवील, त्यांच्या हितानहिताची काळजी वाहील, त्यांच्या जीवाला जपेल, तर असा सेनापती शिपायांच्याकडून वाटेल ते अवघड काम करवून घेऊ शकेल. जेथे शिपायांना आपल्या सेनापतीविषयी प्रेम नसेल तेथे लढाया क्वचितच जिंकल्या जातात, असे अनेक ऐतिहासिक दाखले आपल्याला आढळतील. अशा रीतीने सेनापती आणि सैनिक यांच्या परस्परांमधील प्रेमाची शक्ती हीच खरी शक्ती असते. याच रीतीने लुटारूंच्या टोळीत सुद्धा आपल्या नायकाविषयी पूर्ण प्रेमभाव असतो. त्याच्यासाठी आपला प्राण द्यायला प्रत्येक जण तयार असतो. परंतु, तेच गिरण्या वगैरे मध्ये पाहा; तेथे मालक-मजुरांमध्ये असा गाढ संबंध आपल्याला दिसून येत नाही; आणि मजुरांपैकी कोणीही आपल्या मालकाकरिता आपला प्राण देऊ इच्छित नाही. याचे एक कारण हे आहे की, अशा कारखान्यांतून मजुरांचे पगार अर्थशास्त्राच्या नियमानुसार ठरविले जातात. घरगुती नोकर किंवा शिपाई हा अमुक एका विशिष्ट मुदतीकरिता निश्चित पगारावर घेतला जातो तसे मजुरांचे नसते. बाजारात मजुरांची जशी मागणी असेल त्यावर त्यांच्या मजुरीचा दर चढतो-उतरतो, आणि धंद्याच्या तेजी मंदीवर त्यांचे काम टिकणे किंवा न टिकणे अवलंबून राहते. अशा परिस्थितीत मालक-मजुरात प्रेम नांदण्याची क्रियाच संभवत नाही, उलट अ-प्रेमाची स्फोटक क्रिया सुरू होते.

तेव्हा याबाबतीत दोन प्रश्नांचा आपल्याला विचार करावयाचा आहे :

एक प्रश्न हा की, मजुरांना बाजारात जशी मागणी असेल त्यावर त्यांच्या मजुरीच्या दरात फेरफार न व्हावा अशा रीतीने ते दर बांधून देणे कितपत शक्य आहे.

दुसरा प्रश्न हा की, जसे जुन्या घराण्यात घरधनी आणि नोकर यांचे संबंध, किंवा एखाद्या फौजेत सेनापति आणि शिपायी यांचे संबंध, एकमेकांशी निगडित असतात, तसे संबंध मालक आणि मजूर यांच्यामध्ये राहण्याच्या दृष्टीने मजुरांची संख्या, धंद्याची परिस्थिती काही असली तरी, कायम ठेवणे कितपत शक्य होईल.

पहिल्या प्रश्नाचा आपण विचार करू. मजुरांना असलेल्या मागणीप्रमाणे मजुरीत घट-वाढ व्हायची असे होऊ नये अशा रीतीने पगार कायम बांधून देणे शक्य आहे ही गोष्ट अर्थशास्त्राचे पंडित कबूलच करीत नाहीत ही आश्चर्याची गोष्ट आहे. पृथ्वीच्या पाठीवर जी म्हणून महत्त्वाची कामे आहेत त्या सर्वांच्या बाबतीत, आणि पुष्कळशा बिनमहत्त्वाच्या कामांच्या बाबतीत सुद्धा, पगार निश्चितच केले गेले आहेत. इंग्लंडच्या मुख्य प्रधानाच्या जागेचा काही लिलाव होत नाही. तो कसाही मनुष्य असला तरी त्याला एकच पगार देण्यात येतो. तसेच कमीत कमी पगार घेईल त्याला पाद्री बनवायचे असे करीत नाहीत. वैद्य वकिलांच्या बाबतीत सुद्धा सर्वसाधारणपणे आठ आण्याचे सहा आणे घ्या अशी घासाघीस केली जात नाही. याचा अर्थ या दिलेल्या उदाहरणांसारख्या बाबतीत आपण ठराविकच पगार देत असतो असे दिसून येते.

यावर कोणी चकित होऊन म्हणेल : 'काय म्हणता, चांगल्या आणि वाईट कामगाराला सारखाच पगार द्यायचा ? '

होय, खरे म्हणजे तसेच पाहिजे. त्याचा परिणाम असा होईल की वैद्य-वकिलांची फी एकच असल्याने आपण चांगला वकील किंवा चांगला वैद्य शोधून त्याच्याकडे जाऊ, तसेच मजुरांचा पगार सारखाच असल्याने आपण चांगला कामगार कोण ते शोधून त्याला काम








देऊ. कामगाराच्या चांगलेपणाचे बक्षीस हेच की त्याची 'निवड' केली जाते. म्हणून मजुरीच्या एकूण एक कामांच्या बाबतीत रास्त पद्धती ही की प्रत्येक कामाचे दर ठरलेले असावेत आणि त्याप्रमाणे मजुरी चुकती केली जावी. खोटी पद्धती म्हणजे, अर्ध्याच पगारावर काम करायला कबूल होणाऱ्या कामगाराला काम दिले गेल्याने तो एक तर चांगल्या कामगाराला बाजूला सारतो किंवा त्याच्याशी चढाओढ करून त्याला अपुऱ्या पगारावर काम करायला भाग पाडतो.

आता दुसऱ्या प्रश्नाचा विचार करू. दुसरा प्रश्न असा की, धंद्याची कशीही स्थिती असो कारखान्यात जेवढे कामगार अगोदर ठेवलेले असतील त्यांना कायम ठेवायचे काय? कामगारांना जेव्हा अनिश्चितपणे काम मिळते तेव्हा त्यांना अधिक पगार मागणे भागच पडते. पण, आपली नोकरी आपल्या हयातीपर्यंत चालणार आहे अशी जर त्यांची खात्री असली तर ते पुष्कळ कमी पगारावर काम करतील. तेव्हा जो मालक आपल्या कामगारांना कायमपणे ठेवतो त्याला शेवटी फायदाच होतो, आणि जे कामगार कायमपणे नोकरी करतात त्यांनाही फायदा होतो, हे उघड आहे. अशा मालकांना अर्थात फार नफा होऊ शकत नाही, त्यांना मोठी कामे अंगावर घेता येत नाहीत, किंवा सट्टेबाजी करता येत नाही.

शिपाई सेनापतीकरिता मरायला तयार होतो आणि म्हणूनच शिपायाचा धंदा हा सामान्य मजुराच्या धंद्यापेक्षा जास्त प्रतिष्ठेचा समजला गेला आहे. शिपायाचा धंदा खरे म्हणजे कत्तल करण्याचा नसून दुसऱ्याचा बचाव करताना स्वतः कत्तल होऊन जाण्याचा आहे. जो शिपाई झाला तो आपली जान आपल्या सरकारवर सोपवितो. वकील, वैद्य आणि धर्मोपदेशक यांच्याही बाबतीत असेच आपण समजतो. म्हणूनच त्यांच्याकडे प्रतिष्ठेच्या नजरेने आपण पाहतो. न्याय सिद्ध करण्याकरिता आजीव झटणे हे वकिलाचे कर्तव्य, कितीही अडचणी आल्या तरी आपल्या रोग्याची सेवा-शुश्रूषा करणे हे वैद्याचे कर्तव्य, आणि वाटेल ते झाले तरी आपल्या समाजाला बोध देऊन त्याला योग्य मार्गाला लावणे हे धर्मोपदेशकाचे कर्तव्य आहे.

असे जर वरील धंद्यात घडते तर व्यापार वाणिज्यात का घडू नये? व्यापारी म्हटला की, तो नेहमी स्वार्थीपणानेच वागणार असे गृहीत धरतात, त्याचे काम समाजाला अत्यंत उपयुक्त असे असेल, पण त्याचा मूळ हेतु आपला खजिना भरायचा हाच असतो असे सर्वजण समजतात. स्वतःला जास्तीत जास्त मिळवावे आणि ग्राहकाच्या हाती कमीत कमी ठेवावे या धोरणाला पूरक असेच कायदेही केले गेल्यामुळे तो हेतु एक प्रकारे त्याच्यावर कायमचा लादलाच जातो. ग्राहक स्वस्त मागणार, विकणारा फसविणार हाच जगाचा कायदा म्हणून लोक गृहीत धरतात आणि व्यापारी त्यांच्याच या समजुतीला धरून वागतो म्हणून पुनः अजाणता त्याचा ते तिरस्कार करतात, त्याला अप्रतिष्ठित समजतात.

व्यापाऱ्यांनी ही पद्धती सोडून देणे जरूर आहे. व्यापाऱ्याने स्वार्थच साधावा, पैसाच जमा करावा हा काही नियम नाही. अशा व्यापाऱ्याला आपण व्यापार नव्हे, चोरी म्हणू. शिपाई जसा आपल्या राष्ट्राकरिता मरतो तसे व्यापाऱ्याने लोकांच्या सुखाकरिता नुकसान सोसावे आणि प्राणही द्यावा हे त्याचे कर्तव्य आहे.

सर्व सुधारलेल्या राष्ट्रात पुढील पाच मोठे बौद्धिक व्यवसाय मानलेले आहेत :

शिपायाचा व्यवसाय
राष्ट्राचे रक्षण करणे हा आहे ;
धर्मोपदेशकाचा व्यवसाय
लोकांना शिक्षण देणे हा आहे ;
वैद्याचा व्यवसाय
लोकांना निरोगी ठेवणे हा आहे ;
वकिलाचा व्यवसाय
योग्य न्याय प्रस्थापित करणे हा आहे ;
व्यापाऱ्याचा व्यवसाय
गरजेच्या वस्तूंचा पुरवठा करणे हा आहे;










# सत्याचे मूळ

—आणि या सर्वांचे कर्तव्य वेळ आली असतां राष्ट्राकरिता मरणे हा आहे. कारण ज्या मनुष्याला केव्हा मेले पाहिजे हे कळत नाही त्याला खरोखर कसे जगावे हेच कळत नाही.

लक्षात घ्या की व्यापाऱ्याचे (आणि कारखानदाराचे) काम राष्ट्राला गरजेच्या वस्तू पुरविणे हे आहे. धर्मोपदेशक पाद्रयाचे काम जसे पगार मिळविण्याचे नाही, शिक्षण देण्याचे आहे. तसेच व्यापाऱ्याचे काम नफा मिळविणे हे नाही, पुरवठा करणे हे आहे. शिक्षण देणाऱ्या पाद्रयाला भाकरी मिळते तसा व्यापाऱ्याला नफा मिळून जातो. पण दोघांपैकी कोणाचाही हेतु पगारावर किंवा नफ्यावर दृष्टी ठेवून काम करणे हा नाही. पगार किंवा नफा मिळो न मिळो, दोघांनीही आपला व्यवसाय आपले कर्तव्य पार पाडायचे आहे, हा विचार जर रास्त असेल तर व्यापारी हा श्रेष्ठ मानाला पात्र आहे, कारण त्याचे काम माल उत्तम निर्माण करणे आणि लोकांना पेलेल अशा किंमतीत तो पुरविणे हे आहे. ते करीत असताना त्याच्या हाताखाली जी शेकडो हजारो माणसे असतील त्यांचे रक्षण करणे, त्यांचे पालनपोषण करणे हेही त्याचे काम आहे. ते करताना पुष्कळ धीर, पराकाष्ठेची ममता आणि अतिशय चतुरपणा यांची गरज आहे. अशी वेगवेगळी कामे करीत असताना इतरांप्रमाणे त्यालाही राष्ट्रासाठी प्राण देणे अवश्य झाले तर त्याने तो दिला पाहिजे. असा व्यापारी स्वतःवर कसलेही संकट आले, स्वतः कंगाल झाला, तरी खराब माल विकणार नाही आणि फसवणूक करणार नाही. तो आपल्या हाताखालच्या माणसांशी अतिशय ममतेने वागेल. पुष्कळ वेळा मोठमोठ्या कारखान्यात किंवा पेढ्यात तरुण मुले नोकरी करायला येतात. ती कित्येक वेळा आपल्या घरादारांपासून दूर आलेली असतात. तेव्हा मालकालाच त्यांचे आईबाप बनावे लागते, आणि मालक काळजी घेणारा नसेल तर ही तरुण मुले पोरकी होतात. त्या वेळी व्यापाऱ्याने किंवा मालकाने पदोपदी एकच प्रश्न स्वतःला विचारावा की ' मी जसे माझ्या मुलांना वागवितो तसेच माझ्या नोकरांच्या बाबतीत वागतो की नाही ? '

समजा, एखाद्या लढाऊ गलबताच्या कप्तानाला आपला स्वतःचा मुलगाच एक सामान्य खलाशी म्हणून घ्यावा लागला, तर तो आपल्या मुलाला जसा वागवील, तसेच आपल्या हाताखालच्या प्रत्येक कामगाराला नेहमी वागविणे हे त्याचे कर्तव्य ठरते. याच रीतीने एखाद्या कारखान्याच्या मालकाला आपल्या स्वतःच्या मुलाला सामान्य मजूर म्हणून ठेवावे लागले तर तो जसा आपल्या मुलाला वागवील, तसेच आपल्या कामगारांपैकी प्रत्येकाला नेहमी वागविणे त्याचे कर्तव्य ठरते. याचेच नाव खरे अर्थशास्त्र. आणि ज्याप्रमाणे गलबत धोक्यात आले असता कप्तानाचा धर्म ते सर्वात शेवटी सोडणे हा आहे, त्याचप्रमाणे दुष्काळ वगैरे संकटकाळी आपल्या अगोदर आपल्या मजुरांचा किंवा नोकरांचा बचाव करणे हा कारखान्याच्या मालकाचा किंवा व्यापाऱ्याचा धर्म आहे.

हे सर्व फार चमत्कारिक वाटेल, पण या गोष्टी चमत्कारिक वाटणे हेच खरोखर चमत्कारिक आहे. कारण हे सर्व चिरंतन आणि व्यावहारिक सत्य आहे. ज्या राष्ट्राला उन्नतीला पोचायचे आहे त्या राष्ट्रात या व्यतिरिक्त दुसरी कोणतीही नीति चालूच शकणार नाही. आम्हा इंग्रजांचे राष्ट्र आजवर टिकून राहिले आहे याचे कारण त्याने अर्थशास्त्राचे नियम पाळले आहेत हे नसून त्या नियमांचा, काही थोड्या लोकांनी का होईना, भंग करून वर सांगितलेले नीतीचे नियम पाळले आहेत, हे आहे. या नीतिनियमांचा भंग केल्याने कसे नुकसान होते आणि राष्ट्राची कशी पीछेहाट होते याचा आपण आता विचार करू.

सत्याचे मूळ काय, यासंबंधी आपण पूर्वी पाहिले. त्यावर अर्थशास्त्रज्ञ कदाचित् पुढीलप्रमाणे उत्तर देतील की, " एकमेकांविषयींच्या प्रेमभावनेमुळे काही फायदा होईल हे बरोबर, पण अशा प्रकारच्या फायद्याचा विचार आम्ही अर्थशास्त्रज्ञ कधी करीत नाही. आमचे शास्त्र हे केवळ श्रीमंत होण्याचे शास्त्र आहे. ते शास्त्र खोटे नाही. इतकेच नव्हे तर ते व्यावहारिक दृष्ट्या परिणाम-










कारक आहे असे अनुभवाने दिसून आले आहे. जे त्या शास्त्राप्रमाणे चालतात ते निश्चितपणे श्रीमंत होतात, आणि जे ते शास्त्र मानीत नाहीत ते गरीब होतात. यूरोपमधल्या सर्व भांडवलवाल्यांनी आमच्या शास्त्राच्या नियमाप्रमाणे चालून पैसा कमाविला आहे. जे साध्य झाले आहे असे उघड उघड दिसून येते त्याच्याविरुद्ध युक्तिवाद करणे व्यर्थ आहे. प्रत्येक धंदेवाल्या माणसाला पैसा कसा मिळतो आणि कसा गमावला जातो हे अनुभवाने माहीत असते."

हे म्हणणे बरोबर नाही. व्यापारीवर्ग पैसा कमावितो खरा, पण तो योग्य मार्गाने आपण कमावितो की नाही आणि त्यायोगे राष्ट्राचे भले होते की नाही हे ते माहीत करून घेत नाहीत. 'श्रीमंत' या शब्दाचा अर्थही त्यांना पुष्कळ वेळा समजत नाही. समजत असला तरी निदान तो सापेक्ष शब्द आहे, 'श्रीमंत' म्हटले की, त्याच्याविरुद्ध 'गरीब' हा शब्द आलाच, ('उत्तर' म्हटली की, त्याच्या विरुद्ध जशी 'दक्षिण' आलीच तसे) हे ते लक्षातच घेत नाहीत. अमुक शास्त्रीय नियम पाळले की जणू कोणालाही श्रीमंत होतां येईल असे माणसे चुकीने समजतात. खरे पाहता धन ही विद्युच्छक्तीसारखी एक शक्ती आहे आणि ती विषमता निर्माण करून म्हणजे स्वतःचा अभाव असेल तेथे काम करते. समजा, तुमच्याजवळ एक रुपया आहे. त्याची शक्ती किंवा सत्ता ज्याच्याजवळ तो नाही त्याच्यावर चालते. पण समजा, त्या दुसऱ्या माणसाला त्या रुपयाची गरजच नसेल तर तुमच्या जवळच्या रुपयाला काही किंमत राहात नाही. तुमच्या रुपयाला सत्ता तुमच्या शेजाऱ्यांमधील न्यूनतेमुळे आहे. जेथे कमतरता तेथेच श्रीमंती टिकू शकते. म्हणजे एखाद्या माणसाला श्रीमंत व्हायचे झाले तर त्याने शेजाऱ्याला कमतरतेत म्हणजे दारिद्र्यात ठेवले पाहिजे, असा याचा अर्थ झाला.

'सामाजिक अर्थशास्त्र' आणि 'व्यापारी अर्थशास्त्र' या दोन अर्थशास्त्रांमधील फरक वाचकांनी नीट ध्यानात घ्यावा.

'सामाजिक अर्थशास्त्रा' चा अर्थ एवढाच की, गरजेच्या आणि उपभोग्य वस्तूंची निर्मिती, संभाळ आणि वाटणी योग्य त्या वेळी आणि योग्य त्या स्थळी करणे. हंगामशीर पिकाची कापणी करणारा शेतकरी, चुन्याची भट्टी बरोबर साधून त्या चुन्याचा पक्क्या विटा बांधताना उपयोग करणारा गवंडी, आपले स्वयंपाक-घर नासधूस होऊ न देता संभाळणारी गृहिणी, हे सर्वजण खऱ्या आणि निश्चयात्मक अर्थाने सामाजिक अर्थशास्त्रज्ञ होत, ते आपापल्या राष्ट्राच्या संपत्तीत सतत भरच घालीत असतात.

'व्यापारी अर्थशास्त्र' म्हणजे काही थोड्या व्यक्तींच्या हाती नाण्यांचा संग्रह होणे, की ज्यामुळे त्या व्यक्ती दुसऱ्यांच्या श्रमावर सत्ता गाजवू शकतील. यातील प्रत्येक नाणे एका बाजूची जितकी श्रीमंती दर्शविते तितकीच दुसऱ्या बाजूची कंगाली किंवा कर्जबाजारीपणा दर्शविते. पुढारलेल्या राष्ट्रातील उद्योगी लोकात श्रीमंती-विषयीची कल्पना सामान्यपणें असल्या पैशाच्या संपत्तीशी संलग्न असते. आपल्या मालमत्तेचा हिशेब करताना ते आपल्या शेतजमिनीची आणि गुरांढोरांची किंमत रुपये-आणे-पैत करतात आणि तितक्या पैशांनी आपण श्रीमंत आहो असे समजतात. आपल्याकडे असलेल्या पैशांनी जमीन किंवा गुरेढोरे किती मिळतील असा विचार ते करीत नाहीत.

धनदौलतीची सत्ता जर श्रमावर चालली नाही तर ती दौलत बाळगणाऱ्याला तिचा फारसा काही उपयोग नाही. उदाहरणार्थ, समजा, की एखाद्या मनुष्याजवळ सोने, धान्य, गुरेढोरे, बंगले, बागबगीचे वगैरे आहेत, पण त्याला जर मजूर किंवा गडीच मिळाले नाहीत तर ? त्याला गडी मिळायचे म्हणजे त्याच्या शेजारी कोणी तरी गरीब असला पाहिजे. आणि त्याला त्याच्या सोन्याची किंवा दाण्याची गरज वाटली पाहिजे. कोणालाही तशी गरज नाही समजा, तर मग त्याला गडी मिळणार नाही. अर्थात् त्या धनवान् मनुष्याला आपली आपल्यालाच भाकर भाजावी








लागेल, कपडे शिवावे लागतील, शेत कसावे लागेल. म्हणजे त्याला त्याच्याजवळ असलेल्या सोन्याची किंमत त्याच्या जमिनीवरच्या दगड-धोंड्याइतकीच झाली. त्याचे धान्य कुजून जाईल, कारण तो काही इतरांपेक्षा जास्त खातो असे नाही. म्हणून त्या माणसाला इतरांप्रमाणे सक्त मेहनत करूनच आपली गुजराण करावी लागेल, अशी परिस्थिती जर असेल तर कोणी कितीही लोभी असला तरी, असली संपत्ति इच्छिणार नाही. खरोखर श्रीमंतीच्या नावाखाली इच्छा असते ती, साध्या सरळ भाषेत सांगायचे तर, आपल्या स्वार्थाकरिता दुसऱ्यांचे श्रम मिळविण्याच्या सत्तेची – मग ते श्रम गड्याचे असोत, दुकानदाराचे असोत किंवा कलाकाराचे असोत. आणि ही सत्ता दुसऱ्या मनुष्याच्या गरीबीच्या प्रमाणातच मिळणे शक्य असते. एका सुताराला काम देणारा मनुष्य एकच असेल तर तो सुतार मिळेल ती मजुरी घेईल. पण जर त्याला काम देऊ इच्छिणारे दोन-चार निघाले तर जो जास्त रोजी देईल त्याच्याकडे तो जाईल. तेव्हा सर्वसामान्य अर्थाने 'श्रीमंत' होण्याची कला म्हणजे फक्त स्वतःकरिता खूप पैसा जमा करण्याचीच कला नव्हे तर आपल्या शेजारच्या माणसांना कमी मिळत राहील अशा तऱ्हेची योजना करून ठेवण्याची कला. असल्या विषमता समाजाला लाभदायीच असतात अशी एक अदूरदर्शी व विवेकशून्य समजूत अर्थशास्त्रासंबंधीच्या बहुतेक लोकभ्रमाच्या मुळाशी असते. सर्व माणसे सारखी होतील हे शक्य नाही खरे, तरी गैरवाजवी रीतीने लोकात कमतरता किंवा गरीबी उत्पन्न करण्याने लोक दुःखी होतात. नैसर्गिक रीतीने जी कमतरता आणि समृद्धी राहते तिच्यायोगे समाज सुखी होतो आणि सुखात नांदतो.

---














डॉ. वसंत स. जोशी

# श्री गोविंदप्रभु

## हा इस्वर अवतारु होये:

महानुभाव पंथसंस्थापक श्री चक्रधर यांचे गुरु गोविंदप्रभु हे पंथीयांच्या दृष्टीने परमेश्वरावतार होते. गर्भ, पतित आणि दवडणे या परमेश्वराने अवतार घेण्याच्या तीन प्रकारापैकी गोविंदप्रभूंचा 'दवडण्याचा अवतार' होता. या अवताराने दवडलेला जीव वेडा-पिसा असल्याने त्याचे देहधर्म आणि स्वभावधर्मही स्वाभाविकपणेच या अवताराला स्वीकारावे लागले होते. त्यांचे सर्व वर्तन 'मनुष्य व्यवस्थेस अनसारखे' होते. ते चालायचे शीघ्रतेने. बसायचे तर उकड, पायावर भार देऊन, पायावर पाय ठेवून. चालायचे तर 'गगनाची वास' पाहात. धावणे दुडुदुडु, बोलणे बेंभळ. 'मेली आली : मेली जाए' असे शब्द नेहमी तोंडात असावयाचे. तोच शब्द पुन्हा पुन्हा बोलावयाचा. घ्यायचे तर एकदम आसडून. सेंगुळ बुडडे यासारखे पदार्थ द्यायचे म्हणजे टाकायचेच. नेसणे म्हणजे सोळा हातांचे वस्त्र निरीया घालून डोक्यावर त्याचा पदर घ्यावयाचा. उजवा भाग सोडून डाव्या अंगावर पदर घ्यावयाचा. जे नेसायचे तेच पांघरायचे. त्यांचे व्यक्तिदर्शन कसे होते ? 'मळवट : कुंकुम भरणे : माथां भांग खोपा जवादि भरणे : कर्णी सुकडी लावणे : पायी वांकि : गळां सांखळ : सुकुटी तेल : वेणी : नाभिचुंबित खाड ( दाढी ) तथा स्मश्रु : ' मूर्ति शामगौर होती, शरीराचे सौंदर्य ते(ही) नाही. वामनेत्र लावणे, बाम कनिष्ठिका वक्र करणे हे या मूर्तीचे आरीखपण होते."

महानुभाव पंथात गुंडम प्रभु किंवा गोविंद प्रभु या नावाने प्रसिद्ध असलेल्या या अवतारी पुरुषाचे आईवडिलांनी ठेवलेले नाव 'गुंडो' असे होते. अनंतनायक आणि नेमाइसा ही त्यांच्या मातापित्यांची नांवे. रिद्धपुरापासून जवळच असलेल्या काटसोरे गावचे ते काणव ब्राह्मण. नेमाइसेला झालेली अनेक मुले दगावली म्हणून गोविंदप्रभूंचे नाव हे मूल तरी जगावे म्हणून 'गुंडो' असे ठेवले. वर्षभरातच माता-पिता इहलोक सोडून गेले. मामा आणि मावशी यानी त्यांना वाढविले. सातव्या वर्षी मुंज झाली. तेव्हा उपाध्याने सांगितले 'गुंडो ! वों भवति भीक्षां देही : यणे शब्दे भीक्षा माग.' तेव्हा गुंडो 'भीक्षां देही' म्हणत; परंतु ओंकाराचा उच्चार मात्र करीत नसत. नंतर त्यांचे रीधपुरास आगमन झाले. बोपद उपाध्ये यांचेपाशी त्यांचे वेदाध्ययन सुरू झाले. त्याना एका दिवसात जे समजे, ते इतरांना महिना महिना अभ्यास करून समजत नसे, इतकी त्यांची स्मरणशक्ति तीव्र होती. आपल्या गुरुसही ते कित्येकवेळा चुका सांगत. तेव्हा उपाध्ये म्हणत, 'म्हणता नायको : वाचीता नायको : एकसरे नीगदिताचि आइकतो : गुंडो सामान्य नव्हे. हा इस्वर अवतार होइल : आणि गुरूची ही भविष्यवाणी खरोखरीच सार्थ ठरली.

शिक्षणसमाप्तीनंतर गोविंदप्रभु द्वारावतीस गेले आणि तेथे त्यांनी संन्यास घेतला. दुसऱ्या वेळी चांगदेव राऊळांकडून त्यानी शक्तिस्वीकार केला आणि रिद्धपुरास येऊन जीवोद्धरणाचे कार्य त्यानी सुरू केले. श्री चक्रधरांच्या देहात चांगदेव राऊळानी प्रवेश केला असल्याने गोविंदप्रभूंच्या बाबतीत चक्रधर एकीकडून गुरु तर दुसरीकडून शिष्य होते; परंतु चक्रधरानी आपली शिष्यत्वाची भूमिकाच अखेरपर्यंत ठेवली आणि आपल्या आचरणाने इतरांनाही गोविंदप्रभूंचे माहात्म्य पटवून दिले.

गोविंदप्रभु हा एक उन्मनस्क आणि महानुभावीयांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे 'आच्छादनीचा परद्दश्यावतार' होता. त्यांच्या या अवतारित्वाविषयी वेळोवेळी अनेकानी श्रद्धाभाव प्रकट केला होता. द्राविड देशीच्या एका ब्राह्मणास 'भविष्यपुराणा'त 'रीधौरे गावात ईश्वर अवतार अवतरला' असल्याचे वाचावयास मिळाल्याने त्याची प्रचीति पाहण्यासाठी तो ब्राह्मण रिद्धपुरास आला व त्याचे समाधान झाले अशी



अनुक्रमणिका






आख्यायिका पंथीयांकडून सांगितली जाते. पंथाचार्य नागदेवांनीही 'हा नव्हे देओ : रीधपुरी राज्य करीत असेति' असाच श्रद्धाभाव व्यक्त केला आहे. स्वतः गोविंदप्रभूनीही कृष्ण–रुक्मिणी विवाहप्रसंगी आपल्यात व श्रीकृष्णात असणारी एकरूपता सुचविली होती. अवतारी पुरुषांचे अवतारीपण सामान्य जनाना पटावयाचे तर काही अद्‌भुताचे दर्शन त्यांच्या ठिकाणी घडावयास हवे अशी त्यांची अपेक्षा असते. 'चमत्कारा शिवाय नमस्कार करण्यास सामान्य मनुष्य सहसा प्रवृत्त होत नाही, द्राविडी ब्राह्मणास आपले स्वरूप गोविंदप्रभूनी पुढील श्लोकात स्पष्ट करून सांगितले होते :–

नाहं मनुष्यो न च देवयक्षौ न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः ।
न ब्रह्मचारी न गृही वनस्थो भिक्षुर्न चाहं निजबोधरूपः॥

त्यांचे हे 'निजबोधरूप' सामान्यांच्या आकलना-पलीकडचे होते. त्यांच्या जीवनातील बिकट समस्या सुटण्यावर किंवा दैवी सृष्टीतील घटनांवर अशा पुरुषानी नियंत्रण ठेवून अन्यथा घडवून आणण्यावर थोर पुरुषांचे लोकोत्तरत्व त्यांच्या दृष्टीने अवलंबून असते. अशा अलौकिक लीळा अवतारी पुरुषांकडून स्वाभाविकपणे तर भोंदू बुवांचेकडून सामान्यांना दिपवून आपला प्रभाव टाकण्यासाठी होत असतात. गोविंद-प्रभूंचे वर्तन 'बाल समंध पिशाच'वत् किंवा विदेही पुरुषाच्या आचरणास शोभणारे असे होते. त्यांच्या आयुष्यात घडलेले अनेक चमत्कार त्यांचे दैवी स्वरूप साकार करीत असले तरी गोविंदप्रभू त्याबाबत साक्षेपी होते असे म्हणता येण्यासारखे नाही. वेड्यापिश्याच्या देहधर्मानुसार आणि स्वभावधर्मानुसार त्यांचे सारे जीवन घडत गेले. त्यात कदाचित् कोणास 'नागरपण' आढळणार नाही. पण सामान्य भूतमात्रांविषयी त्यांच्या अंतःकरणात भरून राहिलेली अथांग करुणा मात्र सर्वत्र आढळल्याखेरीज राहात नाही.

### राउळ माए : राउळ बापु : राउळ इस्वरु : राउळ करीति ते काइ नव्हे ?

गोविंदप्रभूंच्या वर्तनात त्यांच्या अलौकिक व्यक्ति-मत्त्वाचे दर्शन घडल्याने भक्तांना वाटणारा आदरभाव हा थक्कितभाव होता; परंतु त्यांची दुःखे निरसून टाकणारे अद्‌भुत प्रसंग मात्र गोविंद प्रभूंविषयी भक्ति-भावच निर्माण करीत आणि स्वाभाविकपणे त्यांच्या मुखातून उद्गार बाहेर पडत, 'राउळ माए : राउळ बापु : राउळ इस्वर : राउळ करीति ते काइ नव्हे' मायपित्याचे अंतःकरण श्रीप्रभूंच्या ठायी त्याना आढळून यावयाचे आणि आपल्या व्यथा निपटून टाकणारा सखासोयराच त्यांच्या रूपाने लाभल्याचा तृप्तोद्गार त्यांच्या मुखातून निघावयाचा. श्री प्रभूंचे चरित्र अशा अनेक चमत्कारकथांनी भरलेले आहे. त्यांच्याविष-यीच्या या स्मृती म्हणजे कृतज्ञभावाची नोंदच होय. आपल्या गुरूच्या वासरासाठी इतर शिष्य डोक्यावर दोन दोन पेंड्या घेऊन येत असता गोविंदप्रभूची पेंडी मात्र अंतराळातून येताना दिसली. ( ३ ) ते झोपले असता त्यांच्या देहापासून प्रकाश पसरल्याचे दिसले. ( ४ ) दामोदर नावाच्या एका लहान मुलाबरोबर ते खेळावयाचे. ते अकस्मात वारल्यामुळे त्याची आईबापे रडू लागली. तेव्हा श्रीप्रभूंच्या मनात 'अनुकुंपा' उत्पन्न होऊन त्यानी जमिनीत पुरलेल्या त्याच्या प्रेतास काढून झाडून जिवंत केले. मृतबालक समजून मायपित्यानी त्याचा अव्हेर केला तेव्हा शेजा-रच्या एका म्हातारीस त्यानी ते मूल देऊन टाकले. तेव्हा तिला 'व्हाटीत पान्हावो आला.' तो पुत्र सतानीक झाली. ( ८ ) अळजपूर गावच्या एका ब्राह्मणाची फळती फुलती द्राक्षवेल त्यानी उपटली आणि वाळल्यानंतर ती लावली. 'तवं ते तीसरां दीसीं फळीं फुलीं घडी मोडत आली.' ( २४ ) मुलाशी खेळत असता श्रीप्रभूंना त्यानी देवळात कोंडून घातले. नंतर पाहतात तर ते अदृश्य झाल्याचे दिसले. ( २७ ) देवळाच्या सांदीत बसलेल्या एका मांजराकडे श्रीप्रभूंनी पाहताच त्याला स्थिती झाली. तीन दिवस ते त्याच अवस्थेत होते. तिसऱ्या दिवशीच प्रभूती 'जाए जाए जाए ना म्हणे' असे म्हटल्यानंतर त्याची स्थिती भंगली व ते निघून गेले. ( ४३ ) एका मेलेल्या वासरालाही त्यानी जिवंत केले. ( ५७ ) देउळवाड्यात संन्याशाना जेवण होते. ते सर्व आत बसले होते. आभाळ आले होते. गगनाकडे पाहून 'श्रीप्रभूंनी' म्हटले, 'आवो मेला जाए : एय ना म्हणे : आवो एचि म्हणे' आणि पाऊस पडू लागला. सारा मठ पाण्याने भरून गेला; परंतु श्रीप्रभूंच्यावर

पाणी नाही. साऱ्यांना आश्चर्य वाटले. त्यांची पत्रावळ काढली तर एकीखाली एक अशा सात पत्रावळी निघाल्या ( ७१ ). एका मेलेल्या गाढवास श्रीप्रभूनी 'उठि उठि' म्हणताच ते जिवंत होऊन ओरडत गेले. ( ८६ ). एकदा विहरणाकरिता ते जात असताना पाऊस आला, तेव्हा 'आवो मेला जाय : राहे राहे म्हणे' असे त्यानी म्हणताच पाऊस थांबला (२१०). एके वर्षी पाऊस न पडल्याने दुष्काळ पडला. लोकांना फार त्रास होऊ लागल्याने पाऊस यावा असे भक्तजनानी विनविले. तेव्हा श्रीप्रभूनी 'गगनाची वास पाहिली.' आणि म्हटले 'आवो मेला जाय : य य ना म्हणे :' आणि 'आभाळ पसरले : वोळले आणि वरीखले : आवघी पृथ्वी सनाथ केली.' ( २१४ ). कमलानायकाची स्त्री मरण पावल्याने तिला स्मशानात नेले असतानाही श्रीप्रभूनी 'तोंडावरि श्रीकारे हाणितले' तेव्हा ती खडबडून उठली व तिने दंडवत घातले. ( २४५ ). परसनायकाच्या मृत मुलासही त्यानी असेच जिवंत केले ( ३०० ). दारवंठ्यात बसलेल्या एका पांगळयाला श्रीप्रभूनी पाय दिले. तर एका ब्राह्मणाच्या मुक्या मुलाच्या पाठीत धुमका मारताच त्याला वाचा प्राप्त झाली. ( २८४.८५ ) एका ब्राह्मणाच्या घरची पडवळ श्रीप्रभूनी उपटली आणि तिसऱ्या दिवशी परत लावली. तर 'ते तीसरां दीसीं नीघाले : फुलीं फळीं मोडोनि आले :' स्वाभाविकच त्यांच्या मुखातून उद्गार बाहेर पडले. 'राउळ माये : राउळ बापु : राउळ करीति ते काइ नव्हे :' (३०१)

## ते थोर कणवेचे :

अंगीकृत कार्यासाठी वा व्यवसायासाठी थोर व्यक्तींचा आशीर्वाद सगळेच अपेक्षितात, मागतात. परंतु गोविंदप्रभूंचा हस्तस्पर्श ज्या पदार्थास झाला त्यापासून थोर लाभ होणार ही लोकांची श्रद्धा होती. याविषयी त्याना अनेकवेळा प्रचीतीही आली होती. म्हणूनच त्यांचेकडून पदार्थ बिघडविले गेले. काही नुकसान झाले तरी शेवटी आपणास फायदाच होणार याविषयी त्याना दृढ विश्वास असे. गोविंदप्रभूंच्या वागण्याकडे श्रद्धाभावाने न पाहता व्यावहारिक नफा-नुकसानीच्या भावनेने पाहिले तर कल्याण होत नाही असाही त्यांचा विश्वास होता आणि तशा तऱ्हेच्या सूचना नवख्या व्यापाऱ्यास वा व्यक्तीस भक्तांकडून दिल्या जात असून त्या सूचनेनुसार वागणाऱ्यांचा फायदा झाल्याचे प्रत्यंतरही लागलीच येत असे. गोविंदप्रभूंच्या अंतःकरणातील थोर कणव सर्वच आर्तजनासाठी होती. त्यांच्या वेडातही एकप्रकारची सुसंगती होती याची कल्पना अनेक स्मृतींतून येते.

एक बाई पाणी आणण्याकरिता निघाली. घरात दुसरे माणूस नाही. लहान लेकरू होते. तेव्हा त्या बाईने आपण पाणी आणीपर्यंत गोविंदप्रभूना लेकरू सांभाळण्यास सांगितले. त्यानी त्यास थोडावेळ खेळविले आणि पाखाली त्यास झोपवून ते निघून गेले. पाण्याहून बाई आली. तिने पाळण्यात बाजेवर मूल पाहिले, पण तेथे ते नव्हते. शेजारी चौकशी केली, बायका म्हणू लागल्या, हां वो ! राउळा हाती लेकरूं कैसे दीधले ? राउळ वेडे : राउळ पीसे : एकाधीये अडी घालीति : एकाधीए वीहीरि घालीति : तेहवलि काइ करीसि ?' हे ऐकून ती फारच घाबरली, परत घरी येऊन पाहते तर पाखालीखाली मूल 'आनंद भरीत नीजैले' असल्याचे दिसले आणि तिला आनंद झाला. ती म्हणाली 'राउळी लेकरुवासि जतन केली असे : राउळ माए राउळ बापु :' (७) एका वडाच्या झाडाखाली साऱ्या गौळणी जमत. तेथे श्रीप्रभु जात त्यांचे दही, दूध, तूप, लोणी ताक चाखत. ज्या गौळणी त्याना चाखू देत त्यांचा सर्व माल जाताक्षणीच विकला जाई आणि ज्या देत नसत त्यांचा माल गावभर फिरूनही विकत नसे. त्या परत श्री प्रभूंच्याकडे येऊन चाखवीत व मग तो माल विके. (२५). एका मातंगाने 'आम्ही पाणियेवीन मरते असो' असे सांगितल्याने राउळाना अनुकंपा उपजली. त्यानी अंगठ्याने एक जागा दाखवून तिथे खणावयास सांगितले. खणल्यानंतर तेथे अमर्याद पाणी लागले. तेव्हा ते मातंग म्हणाले, 'राउळाचेनि प्रसादें आम्ही पाणी पीत असो' (४८). राउळ एकदा शिंप्याच्या घरी गेले. त्यांची दिंडे सोडून एक खाली अंथरले, एक वर पांघरले. शिंप्यानी त्याचे चरण प्रक्षालन केले. खाजे दिले. विडा दिला. अशा प्रकारे सर्व शिंप्यांच्या घरी ते गेले. तेव्हा त्यांची वस्त्रे दुप्पट मोलाने विकली गेली. असा लाभ झाला. ( ५२ ). वाण्याच्या दुकानातही त्यांच्या










अनुक्रमणिका

तागडीशी व वजनांशी त्यानी खेळ केला. वाण्यानी त्यांचा सत्कार केल्यानंतर त्यानाही मोठा लाभ झाला. ( ५३. ). एका बाईचे घरी दुसरें कोणी नसल्याने श्री प्रभुनी तिचे बारा दिवसांचे सुएराचे कामही केले. ' राउळ एते तरी सुएर करीते ' या तिच्या भावनेला त्यानी प्रतिसाद दिला. ( ७२ ).

रिधपुरात राउळ नव्हते तेव्हा ओरखे दरडे पडू लागले, ज्वरु. तापु लागले. खरुजा लागलीया, माणसे मरू लागली. ' राउळे वीण आम्हासि अरीष्टे ऐसी वीघ्ने पावताति ' म्हणून महाजनानी देऊळवाड्यास जाऊन रिधपुरास येण्याविषयी त्याना विनंती केली. राउळानी ते मान्य केले. महेंद्रभटानी तेथील मठ त्यांचेकडून खरेदी केला. तसा ताम्रपट केला व मग राउळ रिधपुरास गेले. (११५.) एकदा एक माळीण मोहाळु विकत बसली असता श्रीप्रभु तिथे गेले व मोहाळु तिच्याकडून सोलून घेऊन खाऊ लागले. त्यांचे दाम विचारुन महेंद्रभट देऊ लागले. तेव्हा ती माळीण म्हणाली, 'आमुचा राउळी मोहाळु आरोगीले : तु दामु काइसया देतासि ? ' तिची ही श्रद्धा पाहून स्वाभाविकच ' म्हाइंभट उगेचि राहिले ' (१७२. ). एकाचा बैल चुकला तेव्हा श्रीप्रभूनी माहारवाड्यामागे तो बसल्याचे सांगितले. तेथे जाऊन पहाता बैल आढळला. तेव्हा तो मनुष्य म्हणाला, ' होती इस्वरु : ' (२०८.) एका म्हातारीचा पुत्र तिच्यावर रागावून निघाला, तेव्हा गोविंदप्रभूनी त्याला समजावून परत पाठविला. (३०२.) त्यांचा सहवास, त्यांचे गावातील अस्तित्व हे भाविकांना कल्याणप्रद असल्याची भावनाच यासर्व स्मृतीमागे असल्याचे दिसून येते.

## राउळ सांगति ते अन्यथा नव्हे :

अवतारी पुरुषांचे ठिकाणी वाचासिद्धी असते असा अनुभव भाविकाना येत असतो. गोविंदप्रभूंची उक्ती आणि कृती ही भविष्यार्थसूचक ठरत असे. काही अनुभवानंतर लोकानी त्यांच्या कृतीचा विशिष्ट अर्थ लावण्यास सुरवात केली. एके दिवशी पाट, चौरंग, ताटथाळा अशा वस्तू श्री प्रभूनी घराबाहेर आणून ठेवण्यास सुरवात केली. लोक म्हणू लागले, राउळ आजिकाइ सुचिक देखत असेति ते नेणिजे : एवढ्यात आग लागून अवघा गाव जळाला आणि श्री प्रभूनी काढले तेवढे वाचले. (१७) एकाद्याच्या घरी कोणाचा मृत्यु व्हावयाचा असेल तर गोविंदप्रभु त्या घरी जाऊन अंगणात तिरडी तयारी करीत किंवा वोले वस्त्र पांघरून जात. ( ४१. ) केशव नायकाचा कोठा झाडताना गोविंदप्रभूना पाहून त्यानी चौकशी केली तर बैल चुकल्याचे आढळले. ( ६८. ) अळजपूरचा नेमाड पांडिया श्रीप्रभूंच्या दर्शनासाठी आला असता त्यानी त्याचे नाक, कान, डोळे, जातील असे सांगितले. त्यानंतर धाडि येऊन टेकिच्या रायाने नेऊन त्याचे डोळे काढले. स्मृतिकार म्हणतो, ' गोसावियाते वीनवीता तरि वाचते : ' (६९.) तीकोपाध्यांची बायको ' मरैलचि ' इसे श्रीप्रभूनी सांगितल्यानंतर साप चावून ती वारली. ( ८१. ) तीकोपाध्येही त्यांचे अंगणात श्रीप्रभूनी काऱ्यांची कीडडी– केल्यानंतर ज्वर येऊन वारले. (८३.) एके दिवशी केशवनायकाच्या घोडवडी (तवेला) शी जाऊन गोविंदप्रभु म्हणाले, ' आवो हे सुटैल : हे न सुटे म्हणे : आवो हे सुटैलची म्हणे ' एवढ्यात आग लागली आणि गोविंदप्रभूनी सांगितलेली घोडी तेवढी सुटली व बाकी सर्व जळाली. ( २६८. ) मानवी जीवनातील अपरिहार्य दुःखांची वा संकटांची जाणीव अशा तऱ्हेने देऊन सामान्यांच्या मनाची आध्यात्मिक तयारीच जणु ते करीत होते.

सामान्याना विलक्षण वाटणाऱ्या, क्वचित् अस्वस्थ करणाऱ्या अशा घटनामुळे एकाद्या व्यक्तीविषयी गैरसमजही होण्याची शक्यता असते. परंतु गोविंदप्रभूंच्या अवतारीपणाविषयी सश्रद्धांचा जसा विश्वास होता, त्याचप्रमाणे त्यांच्या निष्कपट, निरागस आणि अनासक्त स्वभावाचीही त्याना खात्री पटलेली होती. सर्व प्राणिमात्रांविषयी त्यांच्या अंतःकरणात स्नेहभाव वसत होता. एकदा आउसेने तिच्या गुंफेत निघालेला विंचू मारल्याचे पाहून गोविंदप्रभु तिजवर खूप रागावले. (१९१.) रंगीत वस्त्र नेसून आलेल्या आउसेस त्यानी ते बदलावयास लावले. (१९२.) एकदा म्हाइंभटानी मोठ्या श्रद्धेने श्रीप्रभूंसाठी साठ आसूंचे मेघवणी पांघरावयाचे वस्त्र घेतले. तेव्हा ते ' कोपु नटले. ' ते वस्त्र त्यानी भुईवर घासले. आणि मोरीच्या चिखलात घातले. पायाने ते चिखलात कुसकरले. नागदेवाने म्हाइंभटास सांगितल्यानुसार त्याने शोकपूर्वक नमस्कार केल्या-








नंतर ते वस्त्र धुऊन श्रीप्रभूनी त्याचा स्वीकार केला. ( १७२. ). एकदा श्रीप्रभूना स्नान घालीत असताना म्हाइंभटांनी यज्ञोपवीतास चोखणी लावली. चांगले घासून धुतले आणि त्यांच्या हाती दिले. तर श्री-प्रभूनी परत ते चिखलात घालून कुसकरले. ( २७४). एकदा स्नानानंतर त्याना चंदनाची भोरी करुन अर्धचंद्र टिळा रेखून भांगी जवादि भरली. तेव्हा 'आवो मेला जाय: श्लेष्मा श्लेष्मा होय म्हणे' असे म्हणून त्यानी ते सर्व पुसून टाकले. ( २९२ )

अनासक्तबुद्धीचा आदर्शच अशा वर्तनाने ते अनुयायांपुढे ठेवीत होते. सर्वाभूती समानभावाने पाहणे हा तर सर्वच थोर पुरुषांच्या व्यक्तित्वाचा विशेष असतो. गोविंदप्रभूही त्यास अपवाद नव्हते. कुणब्यांपासून ब्राह्मणांपर्यंत कोणाच्याही घरी ते भोजन घेत, पाणी पीत. त्याना सर्वत्र मुक्तद्वार असे. ( ६ ) एका तेलीणीचे पोर लाकाची भाकरी खात होते. ती आपल्या हातात घेऊन श्री प्रभु खाऊ लागले. तेव्हा तेलीण म्हणाली, 'राउळो ! राउळो हे भाकरी तेलीयांची ! तेव्हा श्री प्रभू म्हणाले, 'आवो मेली जाए: तेलीयाची नव्हे म्हणे: हे लांकांची भाकरि:' ( २९ ) मनुष्यनिर्मित भेदभावाच्या, स्पर्शास्पर्शतेच्या कल्पनांचे फोलपण ते अशारीतीने दाखवून देत. एका गरीब म्हातारीने घरी तांदूळ नाहीत म्हणून राळ्याचा भात वाढला. तेव्हा श्रीप्रभु म्हणाले, 'आवो मेली जाय: सोनयांचा भातु म्हणे' हे उद्गार ऐकल्यानंतर साहजिकच तिला धन्यता वाटली असली पाहिजे. ( ३० ) एका सामान्य स्त्री (वेश्या)च्या पाठीवरील फोड आपल्या चरणस्पर्शाने श्रीप्रभूनी नाहीसा केला. ( ४४. ) महारा-मांगांच्या घरी जाऊन, उतरंडी उतरून त्यात मिळेल तो पदार्थ ते आवडीने चाखत ( ४६, ४७ ) मातंग-महाराप्रमाणेच दीक्षित ब्राह्मणांच्या घरी असणारा गोविंदप्रभूंचा हा संचार महाजनाना मानवत नसे ( ४७. ) खाटकाच्या घरी जाऊन त्याचेकडील हाडा मांसांचे वजन ते करीत आणि उपाध्यांच्या घरच्या रांजणात हात धूत. त्यांच्या या वर्तनाने तेही म्हणाले, कोण ठावो- वीर राउळांते राखावे: राउळां-वीण काइ कव्हणी ठावो असे ?'

श्री प्रभूंचे सर्वोत्तम स्वरुप अशाप्रकारे त्यांच्या मनावर बिंबत असे. ( ४९. ) एका वेडसर स्त्रीची चेष्टा करण्यासाठी कुणी तिला 'गोविंद प्रभूना ओवाळ म्हणजे ते चोळी देतील' असे सांगितले. तेव्हा काजळ कुंकू लेवून थाटाने येऊन तिने त्याना ओवाळले. गोविंदप्रभूनी तिचा भाव ओळखून महेंद्रभटांकडे पाहिले. त्यानी तिला चोळी आणि सहा दाम दिले. ( १५३. ) वेस पंडिताच्या छोट्या मुलीच्या तोंडातील आवळा मागून घेऊन श्रीप्रभूनी तो आवडीने खाल्ला. ( १५७. ) एका ब्राह्मणाने त्यांच्याकडे येऊन स्वस्तिवचन केले आणि 'कन्या उपवर झाली असून विवाहासाठी द्रव्य नाही.' असे सांगितले. तेव्हा देवळाच्या उत्तरेस एके ठिकाणी अंगठ्याने उकरून दोन ओंजळी द्रव्य त्याच्या ओट्यात घातले. ( ९५. ) दुःखितांचे आर्त जाणून त्याना सुखी करण्याचा प्रयत्न गोविंद प्रभु कसा करीत याची कल्पना अशा कित्येक स्मृतींवरुन चांगल्याप्रकारे घेऊ शकते.

## इस्वरी काइ अवेवस्था असे ? :
## ऐसे काइ आवडत असे ? :

गोविंदप्रभूंच्या ठिकाणी चांगली विनोदबुद्धीही होती. त्यानी धारण केलेल्या देहस्वभावानुसार बालसदृश वर्तनही त्यांच्या हातून घडे आणि त्यामुळेही विनोदनिर्मिती होत असे. वाटेत आलेले कुत्रे आपणास चावेल म्हणून ते ( आवो केकट खाइल म्हणे ) घाबरु लागले ( ५९. ) आपान वायु सरताना पृष्ठभागाला थाप मारून ते म्हणाले, 'मरतुं मरतुं फेंडि : बोंब्रातुसि कां' ( १०१ ) एकदा आबाइसा जेवत बसली असताना साखरेच्या डेऱ्यातून पसाभर साखर काढून श्रीप्रभूनी तिच्या ताटात घातली. तेव्हा 'म्हाइंभटो ! धावा धावा' असे ती ओरडली. ( १२३. ) स्नान करीत असता एक स्त्री म्हणाली, 'राउळ येते तरि माझी पाठि घासते:' तेव्हा श्रीप्रभूनी तिची पाठ घासली आणि शेवटी तिच्या पाठीत धुमका घालून म्हणाले, 'मेली जाए: पुरे न म्हणे' ( १२९. ) एकदा महदाइसेस साप चावला, त्याचे विष श्रीप्रभूनी उतरविले आणि ते म्हणाले, 'आवो मेली जाए: माहादी सांपे खादली म्हणे: की माहादीया सापु खादला म्हणे' ( १३१. ) एकदा कांडत असताना








साधेने ' गोविंदु आइ : गोवींदु बाइ : ' अशी ओवी गाइली. तेव्हा श्रीप्रभु म्हणाले, ' मर तुं मर तुं ( १७९. ) याच साधेस आबाइसेने श्रीप्रभु पाक नासतील म्हणून राखण्यासाठी ठेवले होते. एवढ्यात श्रीप्रभु आल्याने ती ओरडू लागली. तेव्हा उगाच का ओरडतेस म्हणून ते तिच्या मागे लागले. ती स्थूल असल्याने तिला पळता येईना. श्रीप्रभूनी ' पुढीले आंगी श्रोकरे धरीले ' आणि ते म्हणाले, आवो इळीया कापावे म्हणे : तळीवं करावे म्हणे : सांबारे करावे म्हणे : खांडीव करावे म्हणे : राइते करावे म्हणे : बेलसरी घालावे म्हणे : ' हे ऐकून आबाइसेला साधेने हाक घातली आणि तिने येऊन तिची सुटका केली. ( १८०. ) एकदा महदाइसेने तेलिणीकडून बाशिंग श्रीप्रभूंसाठी मागून घेतले. तेव्हा त्याना विवाहाची प्रवृत्ती झाली. तो एक खेळ त्याना करावयाचा होता. त्यांची इच्छा वास्तव मानून इस्वर नायकाने आपली कन्या देऊ केली. ' आणि गोसावी कोपुं नटले : ' विवाहाचे सर्व संस्कार करण्यात आले. कृष्ण रुक्मिणी विवाहप्रसंगी महदाइसेस काव्य रचण्याची त्यानी स्फूर्ती दिली. आपण स्वतः श्रीकृष्ण असल्याची सूचनाही त्यानी आपण रुक्मिणीच्या राउळी जेवल्याचे सांगून दिली. ( २२४. ) श्रीप्रभु ज्याचेवर रागवत त्यास ' साणुबाइ यां हो : तुम्ही याते खां ' असे म्हणायचे. एकदा साणुबाइच्या मठात स्वतःच जाऊन ते म्हणाले, ' ' आवो आता याते खा ' आणि हसले. ( २५४. ) एकदा एका लहानपणीच्या मित्रास श्रीप्रभूनी घुमका हाणला. तेव्हा तो म्हणाला, ' हे काइ राउळ ! माते घुमकेनि कां हांणितले ? ' तेव्हा त्याच्याकडे हसत पाहून श्रीप्रभु म्हणाले, ' तू बोपा नव्हेस ? भोइया नव्हेस ? ( २५६. ) आपल्या बालमित्राच्या सहवासातील प्रसंगांचे स्मरणच जणु त्याना या निमित्ताने झाले होते.

बालकाची निरागसता त्यांच्या बोलण्या-वागण्यात दिसून येते, तर बालकांशी खेळताना ते त्यातीलच एक बनत यात नवल नाही. त्यांच्यासमवेत लपंडावाचा खेळ खेळताना विनायकाच्या मूर्तीमागे ते लपून राहिले. मुलानी प्रथम पाहिले तेव्हा त्याना ते दिसले नाहीत. परत ' गुंडो ' अशी हाक मारताच ते तेथेच प्रकट झाले. ( १२. ) चिंचोऱ्यांचा खेळ खेळताना त्यानी सर्व चिंचोरे जिंकले आणि नंतर ' होजे रे होजे रे ' म्हणून ते सर्व उधळून टाकले. त्यावर मुलांच्या झोंबी पडल्या. १३. विहिरीवर आंघोळीसाठी मुले व गोविंदप्रभु गेले असता मुलांना पाण्यात बुचकळण्याचा खेळ त्यानी केला ' राउळो ! बुडालो : बुडालो ' म्हणून मुले ओरडत व त्यांच्या काखेस लागत. १९. वृद्धावस्थेत शिमग्याचा सण खेळण्याची त्याना प्रवृत्ती झाली. त्यांच्या बालपणाचे स्नेही त्यांच्यासमवेत खेळावयास आले. चार प्रहर रात्री त्यानी बाळकाचीया ऐसीया क्रीडा केली. चीखलु : माती : राख : सेन ऐसा खेळु केला : मग : कापुरु : कस्तुरि : चंदन मळणे : सेंदूर ऐसा खेळु जाला ( २८०. ) एकदा श्री प्रभु आडाजवळ जाऊन काठाशी उभे राहून आपले प्रतिबिंब पाहू लागले. आपल्याशीच बोलत, गोष्टी करीत. नखानी दाढी विंचरीत, हास्य करीत, आडात हात घालीत, आडाच्या काठावर लोंबता चरण ठेवीत. ' ऐसा खेळु करीति. २८८. असाच खेळ त्यानी एकदा आरशासमोर उभा राहून केला व म्हणाले, ' आवो बोलते म्हणे : गोष्टी करीते म्हणे : आवो हांसते म्हणे : आवो नटते म्हणे : ' २९५. गावातील मुली वाळूसारा पूजीत असता त्यांच्यामध्ये जाऊन त्यानी थोडा वेळ खेळ केला. ३०८. एकदा गाईस स्पर्श करुन, कुरवाळून पान्हा आणला. बाजूस बसून दोहण्याचा अनुकार केला. नंतर, ' आता पुरे ' हे वासरास होईल. ' आवो वासरू सोडि सोडि म्हणे ' म्हणोनि हास्य स्वीकारीति ३१६. एकदा रांजणामध्ये त्यानी सूर्याचे बिंब पाहिले. ते आपल्या हातानी त्यानी धरावयाचा प्रयत्न करताच पाणी हलले आणि बिंब दिसेनासे झाले. तेव्हा ते म्हणाले, ' आवो मेली जाय : पपते ( पळते ) म्हणे : ' परत तोच खेळ त्यानी केला. हाताशी सूर्यबिंब आले नाही तेव्हा ' आवो मेला जाय : गेला गेला म्हणे ' म्हणोनि हास्य करीति ( २६०. ) एखाद्या मंदिरातील देवतेशीही त्यांचे संभाषण चालत असे. एकदा चंडिकापुरास गेले असता गणेश, चंडिकेच्या मूर्तींना त्यानी स्पर्श केला आणि म्हटले, ' आवो आवो मेली जाए : तुं एथ आहासि म्हणे : ' आणि तेथेच गाभाऱ्यात पहुडले ३१४.












### ऐशी प्रसादाची नावे :

थोर पुरुषांचा क्रोध, त्यांच्या शिव्या हा प्रसाद स्वरूप मानण्याची भाविकांची भूमिका असते. गोविंद प्रभूच्या मुखात असे काही शब्द वरचेवर येत. पण त्यातील निष्कपट भावच त्यातून व्यक्त होत असे. महदाइसा आबाइसेचा वाद ऐकून त्यानी महदाइसेस ' माहादी फेंदी दर्भेयाची दर्भी ' अशी शिवी हासडली एकदा रागावले असताना 'आवो मेला जाए : रुंड मुंड : खापराखोड : माती मीळ म्हणे ' ऐसीया सवीया देति १३७ एकदा नागा राउळाची बहीण श्रीप्रभूंना भेटावयास आली. त्यावेळी ते झोपले असता तशीच त्यांच्याजवळ गेली. तेव्हा ते जागे झाले व ' कोपु नटले,' म्हणाले ' आवो मेली जाए: बोडीकारी बोसारी बोचकवडी बोचकवडी होए म्हणे : १४० एक महात्मा व महात्मी सरिवीणा घेऊन आली व त्यांनी विविध राग गायले. तेव्हा श्रीप्रभु म्हणाले ' मर तू बोडी मोसारी आणि तीये उगीची राहीली. १४१ स्त्रीवेशात आलेल्या एका महात्म्यास श्रीप्रभु म्हणाले, ' आवो ! मेला जाए जाए : बोडीकारु मोसारी ! पंचकवडीया: ' आवो मेला जाए जाए : फेडि फेडिना म्हणे : त्याने तो वेष टाकून दिला, तेव्हा त्याना संतोष झाला. १४५ पाडव्याच्या दिवशी नगरस्त्रिया श्रीप्रभूंना ओवाळावयास येत. तेव्हा एकीस ओवाळताना ते म्हणाले, ' आवो पुश्चळी पुश्चळी होए म्हणे: ' तेव्हा स्वाभाविकच ' ते लाजीली : ( व ) पळाली: ' १५२. इतरजनाना चमत्कारिक वाटणाऱ्या या शिव्या भक्त-जनांना ओव्यासारख्या वाटत. आपल्या अनुयायांना प्रसंगविशेषी गोविंदप्रभु विशिष्ट नाव ठेवीत व त्याच नावाने बऱ्याच वेळा त्याना संबोधीत. कोथळोबा हे अंगाने स्थूल, मोठे-धाट होते. त्याना ते ' आवो कोथळा कोथळा होय म्हणे ' म्हणावयाचे. १९४. इस्वरनायक पुष्कळ पाणी प्यावयाचे. त्याना ' पाणि-संबळा ' म्हणावयाचे. त्यांचे डोके मोठे असल्याने ' थोरु सीसा ' असेही ते त्याना म्हणत. श्रीप्रभूंच्या अशा तऱ्हेच्या नामकरणाबाबत ' ऐसी प्रसादाची नावे गोसावी ठेवीली ' अशी भाविकांची भावना होती. २४८. म्हाइंभटाना त्यानी ' चारू वारू ' हे नाव ठेवले होते. २५०. या नामकरणामागे श्रीप्रभूंची कौतुकाची, संतोषाची भावना असे.

गोविंदप्रभु रागावले म्हणजे ' आवो मेला जाए : बोले दांडेवरि सीस लावावे म्हणे ' असे उद्गार काढा-वयाचे. ६३. त्याना भेटण्यासाठीं एकदा दामूर्त आला असता थोड्या वेळाने त्यास त्यानी जाण्यास सांगितले. एकदोनदा सांगूनही तो गेला नाही तेव्हा रागावून जवळच्या एका नारळाने त्यास श्रीप्रभूनी मारले. तेव्हा तो घरी गेला. हा प्रकार पाहून भक्तजन मात्र घाबरले. नागदेव व म्हाइंभट दामूर्ताच्या घरी त्याच्या चौकशी-करिता गेले. तेव्हा तो म्हणाला ' श्रीप्रभू ' आताच माझ्याकडे येऊन गेले. माझ्या कपाळास स्पर्श करून म्हणाले, ' आवो मेला जाए : दुखवला म्हणे. ' माझे सर्व दुःख त्यानी निरसून टाकले. स्वाभाविकच त्या दोघाना मोठे सुख झाले. अशी होती गोविंदप्रभूंची भक्तजनाविषयीची कणव. १०९ एक गृहस्थ गाडीत गूळ भरून विक्रीसाठी बाजारात आला होता. तेथे जाऊन श्रीप्रभूनी गुळास हात घातला, तेव्हा त्याने त्यांचा हात धरला त्यामुळे श्रीप्रभु रागावले. पायाने तो गूळ त्यानी विध्वंसिला. मातीत मिसळला. गूळ बाटल्याने महाजनापाशी गाऱ्हाणे नेले. तेव्हा महाजन म्हणाले, ' राउळांचा गावो : राउळ समर्थ : तू आधीच त्याना गूळ घेऊ दिला असतास तर तुला दुप्पट लाभ झाला असता. अजूनही जाऊन त्याना विनंती कर. ' मग त्याने येऊन त्यांना विनविले. तेव्हा त्यास दुणा लाभ झाला. ( १७३. ) भक्त-जनांच्या आचरणात शैथिल्य नसावे याबाबतीतही त्यांचा कटाक्ष असे. एकदा म्हाइंभटाची स्त्री देमाइसा व कोथळोबा पायावर पाय ठेऊन तांदूळ कांडीत होते. ते पाहिल्यानंतर म्हाइंभटाच्या मनात विकल्प निर्माण झाला. एवढ्यात श्री प्रभु तेथे आले व कोथळोबास म्हणाले, ' आवो मेली जाए : पायावरुनि पाओं फेडि फेडि फेडि ना म्हणे ' १९७ कोथळोबाचे अंतःकरण त्यानी जाणले होते. म्हणूनच एके दिवशी म्हाइंभटाची समजूत घालून ते म्हणाले, ' आवो मेला जाए : कोथळा तैसा नव्हे म्हणे ' म्हाइंभटाने ते ऐकून त्यांना दंडवत घातले. तेव्हा श्री प्रभु म्हणाले, ' आवो मेला जाए : कोथळोबासि घाल म्हणे : ' म्हाइंभटानी कोथळोबास दंडवत घातले आणि त्यांचे ' वोखटे नीरपौनि फेडीले ' ( १९८ ).








## श्री गोविंदप्रभु

भक्तजनाना प्रसाद म्हणून श्री प्रभु जे द्यावयाचे त्याचे मोल त्यांना विशेष वाटे. एकदा आपली हलणारी दाढ काढून त्यांनी ती साधेला प्रसाद म्हणून दिली. १७५. एकदा नखे काढीत असता तीच साधेस दिली. तेव्हा तिने ती चिरकुटात घालून गळयास बांधले. १७६. इतरेजनांना तांबुलाचा प्रसाद मिळत असल्याचे पाहून साधे मनात म्हणाली, ' मी पापीनि प्रसादा चुकत असे. ' तिचा हा मनोर्थ जाणून गालात धरलेली एक फोड श्री प्रभूनी तिला प्रसाद म्हणून दिली. १७७. साधे या शिष्येविषयीचे त्यांचे ममत्व अनेक स्मृतीतून दिसून येते.

गोविंदप्रभूना खाण्यापिण्यात मोठी रुचि होती. त्यांना आवडणारे अनेकविध पदार्थ तयार करून घालण्यात भक्तांनाही मोठा आनंद वाटे. महदाइसेने पाककलेतील आपले कौशल्य पणास लावून श्री प्रभूंना संतुष्ट केले होते. आहाराच्या बाबतीत त्यांचा चोखंदळपणा असला तरी संयम मात्र नव्हता. त्यामुळे त्यांच्या आहाराला खादाडपणाचे अतिरेकी स्वरूप प्राप्त होत असे. त्यांच्या जीवनाचा अंतही अशा खादाडपणामुळे ' बहिरतीचा उपद्रवो ' होऊनच झाला होता. म्हाइंभट व श्री प्रभु यांची प्रथम भेट या दृष्टीने लक्षात घेण्यासारखी आहे. त्याने येताना श्री प्रभूंसाठी गूळ आणला होता. त्याचा स्वाद त्यांनी कसा घेतला पहा. ' मेला जाए : आतां होये म्हणे : म्हणौनि श्रीकरीं गुळु घेतला : श्रीमुखीं घातला : खावों लागले : आवो मेला जाए : गोड आहे म्हणे : म्हणौनि दुसरेनि श्रीकरें भेली श्रीमुखीं घातली : आणि आरोगुं लागले : ते श्रीमुखुनि ओघळु नीगेति : ते खाड माखे : दोंदावरि गळे : ऐसा गुळु आरोगीला :'' तेव्हा आबाइसेने त्यांना म्हटले, ' जी जी : पुरे कीजो : पोटु दुखैल : ' असे म्हणून गुळाची दुरडी तिने आत नेली. ९७. नवचंडीसाठी कुमारी बोलविल्या होत्या. तेथे जाऊन गोविंदप्रभूनी पाक चाखला.. ' हे गोड आहे. हे नाही, हे आंबट, हे खारट, हे आळणी ' असे म्हणून यथोचित आरोगणा केली. ११८. एकदा कणीक मवार न झाल्याने पोळया निबर झाल्या होत्या. तेव्हा ' हे पींढे पीढे होय म्हणे ' असे ते म्हणाले १४७. सुकल्या भाजीत आलेले गवतही त्यांनी काढून दाखविले. १४८. मैळभटाचे घरी ते गेले. तेव्हा ' तुप भातु : बळीयाचे आंबट : ऐसी आरोगणा झाली. ' तेवढ्याने समाधान न होऊन ' आणिक घाली म्हणे : मग आणीक आंब वाढीले. मग थोडे आणि चवळेयांचे वरण तुप : सेवटी दुधभाताची आरोगणा जाली : ऐसी यथोचीत आरोगणा केली. ' २०१. बोरे विकावयास आलेल्या माळणीकडील बोरेही ते आरोगीत. २१६. एकदा मधुकाकडी खाण्याची इच्छा त्यांना झाली. तेव्हाही रौरीच्या माळयास तसे स्वप्न पडून तो मधुकाकडी घेऊन आला २१८. चैत्र वैशाखात गव्हाच्या ओंब्या खाण्याची आणि भाद्रपदात आंबा खाण्याची त्यांना इच्छा झाली. नागदेव, म्हाइंभटासारख्या भक्तानी प्रयत्नपूर्वक त्या त्या वस्तू त्यांना आणून दिल्या. २१९. वांग्याची भाजीही त्यांना अशीच वाढण्यात आली. २२२. एकदा सर्व भक्तजन भुकेले असताना श्रीप्रभु एका गुऱ्हाळावर गेले. तेथे एकाने पाटीभर तीळ आणले होते. नंतर घागरभर काकवी आणली. तीळ काकवी एकत्र कालवून त्यानी प्रसाद केला भक्तजनानी दोन दोन घास घेतले. तेव्हा श्री प्रभूनी ' डोळो डोळो ' असे समाधानाचे उद्गार काढले. २३९. खातियाच्या घरात श्री प्रभु गेले असता त्यांना ताटामध्ये ' चारोळिया : गोंडंबीया : उततियांचे कूट : खोबरेयाचे खे : गुळु : साखर : ऐसे खाजे एकत्र करून वाढण्यात आले. तेव्हा त्यांना समाधान झाले. ३०४.

महदाइसा ही महानुभाव पंथातील कवयित्री गोविंदप्रभूंच्या सेवेत तिने बराच काळ घालविला. श्रीप्रभूंच्या स्वभाव वैशिष्ट्यांची तिला चांगली पारख होती. तिने एकदा पासवडीची पाटी वाळत घातली होती. ती कोणीतरी नेली. श्री प्रभूनी गमतीने म्हटले ' आवो मेली जाए : पाटी चोरें नेली म्हणे : ' तेव्हा महदाइसा म्हणाली, ' गोसावीं नेवों कैसी दीधली ? ' हे ऐकून गोविंदप्रभु हसू लागले. ८६. आहारात धरबंद नसल्यामुळे त्यांना उदरव्यथेचा त्रास वरचेवर होई. त्यावेळी महदाइसा शेगडी पेटवून शेक देत असे. ८७. महदाइसेने एकदा त्यांना धिरडे धरून घातले, तर तो ' आहीता ' असल्याचे गोविंदप्रभूनी सांगितले. तेव्हा त्यांना हवे असलेले धिरडे सुगरणपणाने तिने करून घातले. ८८. त्याच्याकरिता गरम अमृतफळेही तिने








केली. ८८. गोविंदप्रभु ज्या वाटेने जात त्या वाटेवर झाडून, सडा टाकून महदाइसा चौक रंगमालिका भरीत असे. ९०. महदाइसेप्रमाणेच नागदेव आणि म्हाइंभटही अनेक दिवस श्रीप्रभूंचे सेवादास्य करीत होते. चक्रधरांच्या निर्याणानंतर श्रीप्रभूंच्या सान्निध्यात त्यांच्या अहंभावनेचा आणि ममत्वाचा निरास होऊन सेवावृत्ती व नम्रता अंगी बाणली. म्हाइंभटाचे ठिकाणी व्यवहारदक्षता होत ? त्यामुळे रिधपूरचा मठ विकत घेण्याची व्यवस्था त्यानी केली. मठात येणाऱ्या भक्तजनांची व्यवस्थाही ते पाहात. श्रीप्रभूना ओवाळण्यास येणाऱ्या स्त्रियाना एखादे वस्त्र आणि द्रव्य देण्याचे कामही ते करीत. उत्तम वस्त्रे व अन्न याबाबत असणारा त्यांचा चोखंदळपणा श्रीप्रभूंच्या सहवासात कमी होऊन 'रंदेया चेंदेया दरू भरिजे' हे सूत्र त्यानी अंगी बाणविले.

## गोसावी कव्हेसि रूप केले

गोविंदप्रभूंच्या अवतारी स्वरूपाचे दर्शन भक्तजनाना अनेक प्रसंगातून घडे. त्यांचा चोखंदळपणा अनेक बाबतीत दिसून येई. त्याचप्रमाणे अनेक वस्तूंची, कलांची परीक्षाही ते चांगल्याप्रकारे करू शकत. गोविंदप्रभू नरसिंहाच्या चौकात बसले असता एक नाच चालला होता. नाचताना नाचणीचा ताल चुकला हे कोणाच्या ध्यानात आले नाही. परंतु श्री प्रभूंच्या ते लगलीच लक्षात येऊन ते म्हणाले, 'आवो मेली जाए : चुकली म्हणे : एथ चुकली :' ते ऐकून ती नाचणी म्हणाली, 'जी जी : चुकलीये जी : माझीए कळे प्रमाण कव्हणीचि नेणे जी, ते गोसांवी जाणीतले जी: माझेया दैवभाग्यासि उदो जालाः जे गोसांवी माझीय कलेसि रूप केले.' आपली परीक्षा करणारा जाणकार तिला त्यांच्या ठायी आढळला. १०७. नृत्यपरीक्षेप्रमाणेच अश्वपरीक्षाही त्याना चांगली अवगत होती. करंड मळया नजीक घोडे विकणारे हेडाउ उतरले होते. श्री प्रभू तेथे गेले आणि घोडे पाहात म्हणू लागले, 'हा घोडा नीळा पांचासियाचा : हा गांगा : हा कुमैतु : हा बोरू : हा सरंगा : हा अस्व जातिचा : हा गजु : हा खरू : आवो मेली जाय : या तीनीचि जाति : चौथी नाही म्हणे :' हेडाउनी दंडवत घालून त्याना तूपरोटी दिली. ती आरोगणा करून श्री प्रभु तेथून गेले.

१६१, केसवनायकाने विहीर खणली पण पाणी लागले नाही : श्री प्रभु तेथे गेले असता आपले दुःख त्याने श्रीप्रभूना सांगितले, तेव्हा एके ठिकाणी उजवा पाय आपटून तेथे त्यानी खणावयास सांगितले. 'मग तेथे खांणीतले : आणि जळांत पाणी लागले.' १६४. सोन्याची पारखही श्रीप्रभूना चांगली होती. म्हाइंभट बाजारात नानवटू ( नाण्यांचा व्यवहार ) करण्यास बसत. तेथे जाऊन श्रीप्रभु बसले व काही नाणी काढून 'हे वांकट : हे खोलट : हे तुक मठ; होए : होए : हे नव्हे :' असे म्हणत काही वेळ त्यानी खेळ केला. ३०५, सोवन्यांच्या जवळ जाऊन कसवटी घेऊन तीस सोने लावीत. 'हे बावनकस : हे अठेचाळीस कस' अशी कसोटी पहात. ताजव्यात घालून वजन करीत 'हे पुरले : हे न पूरे' असे म्हणत. 'गुंज : वाल : जउ : तोळी दुतोळी : मासा :' असा खेळ करीत आणि निघून जात. ३०६.

## गोविंदप्रभु आणि चक्रधर :

रामयात्रेच्या निमित्ताने बाहेर पडलेले चक्रधर परमेश्वरपुरास आले आणि तेथे श्री प्रभूकडून त्यानी ज्ञानशक्ती स्वीकारली ( लीचए ७,) एकदा श्रीप्रभूनी चक्रधराना चाऱ्यांच्या सूत वडविण्याच्या मोगरीने पृष्ठ भागावर तीन घाव दिले. तेव्हा बाइसा ओरडली 'वडीले बाबेनि धाकुटा बाबा मारिला.' चक्रधर मात्र आपल्या गुरूस म्हणाले, 'श्रीकरू दुखविती जी : पुरो दीजो जी : 'मग श्री प्रभूनी मोगरी टाकली : आपल्या गुरुविषयींचा चक्रधरांचा आदरभाव विलक्षण होता. त्याची जपणूक करण्याविषयी ते फार जागरूक असत. श्रीप्रभूंच्या सान्निध्यात आसताना स्वतःकरिता पूजा ते घेत नसत ( लीचपू. भा. २. पृ. १२). श्रीप्रभूना त्यानी एक वस्त्र प्रदान केले. ते नंतर बाइसेने धुळीने भरले म्हणून झाडले तेव्हा चक्रधर म्हणाले, 'हे रज कैसे : हें ब्रह्मादीका दुर्लभ की' (लीचपू. भा. २ पृ. २०).

## गोविंदप्रभूंचे वृद्धत्व व देहान्त

वयोमानानुसार गोविंदप्रभूना वृद्धत्व आले. डोके मान हात थरथर कापू लागले. जेवलेले अन्न पचेनासे झाले आणि 'बाहीरितीचा उपद्रो' सुरू झाला आबैसादि भक्त जनानी 'वोखद स्वीकरीजो जी' अशी विनंती केली ती नाकारून ते म्हणाले, 'आवो आता जाइजैल






म्हणे : ' त्यांचे हे निरवानिरवीचे भाषण ऐकून नागदेवानी काकुलतीस येऊन श्री प्रभूना विचारले, 'श्री चक्रधरानी आम्हास तुमच्या स्वाधीन केले. आता आपण जायचे म्हणता. तरि आमते कवणासि नीरोवीले जी : ' तेंव्हा गोविंदप्रभु म्हणाले, ' आवो मेला जाए : ये आवधी तुज नीरोवीली: आणि तुते श्रीदत्तात्रयप्रभुसि नीरोवीले ' चक्रधारनी आपल्या पंथाची धुरा वाहणारा समर्थ शिष्य म्हणून नागदेवाची निवड केली होती ती गोविंदप्रभूनीही सार्थ असल्याचे या उद्गारानी दाखवून दिले. वय संवत्सरी भाद्रपद वद्य चतुर्थीच्या दिवशी गोविंदप्रभुनी इहलोकातून प्रयाण केले.

## "माझे माहेर गेले :"

गोविंदप्रभूंच्या या विलक्षण जीवनातही त्यांच्या परम कारुणिक मनाचे दर्शन घडविणारा एक स्नेहबंध अस्वस्थ करणारा आहे. सर्व भूतमात्रांवर स्वाभाविक स्नेहदृष्टी सर्वच महात्म्यात असते, परंतु अनाथ पोरक्या जीवांच्या जीवनात त्यांच्या स्नेहपूर्ण शब्दांना आणि कृतींना फार मोठे स्थान असते. हे थोर पुरुष म्हणजे अशा दुबळ्या जीवांची 'श्रीमंते माहेरे' असतात. त्यांच्या लौकिक आणि पारलौकिक सुखदुःखांची काळजी असे महात्मे वाहात असतात. गोविंदप्रभूना पितृस्थानी मानणारी एक लेक त्यांच्या जीवनातील मानवी अंगाला स्पर्श करून जाते. पित्याचे हे कृपाछत्र नाहीसे होताच वृक्ष कोसळताच वेली निराधार व्हाव्यात तशी ती हालळ विल्हळ झाली. त्यांच्या या अलौकिक स्नेहसंबंधाचे दर्शन घेण्यासाठी ते प्रसंग मुळातूनच वाचणे अगत्याचे आहे.

एके दिवशी अंगणात फेऱ्या घालत असताना श्री प्रभु म्हणाले, ' लेकि जावाइ येईल. चीरचोळी घ्या. ' ही श्रीप्रभूंची मानसकन्या म्हणजे सावळापूरच्या एका ब्राह्मणाची सून. तिचे कोणी मायबाप, भाऊ बहीण नव्हते. तिला मोठा सासुरवास व्हायचा. एके दिवशी तिच्या नवऱ्याने तिला खूप मारले. आणि शिव्या घातल्या. ' चालती हो ' म्हणाला. तेंव्हा ती रागाने निघताच नवऱ्याने विचारले, ' तू कुठे निघालीस ? '

ती म्हणाली, ' मी आपुलिया माहीयरा जाति असे.'

' कुठे आहे तुझे माहेर ? '

' हे नव्हे का रिधपुरात '

' तेथे कोण आहे'

' राउळ आहेत ना.' असे म्हणून ती निघाली तेंव्हा तिच्या समवेत तिचा पतीही निघाला.

आज गोसाव्यांची कोणती लेक येणार याचा म्हाइंभट विचार करीत आहेत, एवढ्यात ही आली. गोसाव्यानी श्रीप्रभूनी लेकीस खेवदिली. ती त्यांच्या गळयात मिठी मारून रडू लागली. नंतर आबाइसेने तिला उटीले: न्हाणीले : जेऊ घातले : पाच दिवसपर्यंत ती राहिलि नंतर म्हाइंभटानी तिच्यासाठी चीरचोळी घेतली. जावईबापूसाठी पासवडी घेतली. आणि नंतर उभयता परत गेली. पुन्हा एकदा ती आपल्या या मानसपित्यासाठी धिरडी आणि वाडगाभर तूप घेऊन आली. ती इतकी छान झाली होती की वाडग्यात धिरडी बुडवून ते ती खाऊ लागले. शेवटी आबाइसेने धिरड्यांची दुरडी बाजूस काढली तेव्हा त्यांचे खाणे थांबले. आपल्या पित्याची आवडी पुरविणारी ही त्याची वेल्हाळ बाळा होती. (१५६) तिच्या जीवनातील माहेराच्या अन्यायाची पोकळी आपल्या अति स्नेहाळ वृत्तीने गोविंदप्रभूनी भरून काढली होती. ही दुःखार्त लेक आपल्याकडे येणार हे त्यांच्या प्रज्ञाचक्षूंना आधीच जाणवले असल्याने तशी सूचना त्यानी म्हाइंभटा दिकाना देऊन ठेवली होती.

सावळापुरास गोविंदप्रभूंच्या निजधामगमनाची वार्ता गेली. पाणवठ्यावर गेलेली ही लेक वार्ता ऐकताच तेथेच घागर ठेवून दुःखाक्रांत होऊन आली. ' ते दुखे करूनि ' डोळा काइ देखेना. आवघी वाट बापाकारणे रडीजे : ' इकडे गोविंदप्रभूंच्या सर्वांगास चंदन लेप देऊन फुले घातली होती. मुखी तांबूल घातला होता. नवा रेशमी शेला पांघरविला होता. नागदेव, महाइंभटानी त्यांचा देह चिंचेतळी नेला व खड्डा खणू लागले. एवढयात ' पैलाकडौनि गोसाविय़ांची लेकि आली. ' तिने श्री प्रभूंची कीडडी पाहिली आणि तिने धाडकन जमिनीवर अंग टाकले. तिला मूर्च्छा आली. तेंव्हा नागदेव म्हाइंभटानी धावत येऊन तिला सावध केले. ती हालल-विल्हळी रडू लागली. श्रीप्रभूंच्या देहावर अंग टाकून ' माझे माहेर गेले. ' म्हणून मोठ्या आलापाने रडू लागली. तिचे हे दुःख पाहून नागदेव म्हाइंभटाचे अंतःकरणही दुःखाने व्याप्त झाले. सर्व भक्तांना मोठे दुःख झाले. नागदेव म्हाइंभट म्हणाले, हे साचोकारी गोसावियांची








लेकी होए.' नागदेव म्हणाले, 'आमते लाळिले : इस्वरू ऐसी प्रतीति : आम्हासि एवढे दुःख नाही.'

श्री प्रभूंचा निक्षेप केल्यानंतर सर्वजण परत निघाले. तेव्हा आपल्या सोबत नागदेव म्हाइंभट गोसाव्याच्या लेकीलाही नेऊ लागले; परंतु ती येईना. माहेरपणाची चीरचोळी त्यानी देऊ केली, पण तीही तिने घेतली नाही. ती म्हणाली, 'आता काई घेईन ? काई माझे माहेर आहे ? आणि परत निघून गेली. श्रीप्रभूंच्या निक्षेपाच्या ठिकाणी पुढे महाजनांनी देउळी केली. (३२५)

गोविंदप्रभूंचे व्यक्तित्व हे असे बहुविध आहे. त्यांच्या वेडातही एक संगती आहे. त्यांचे अंतर्याम प्रेमभावपूरित आहे. रंजल्या गाजलेल्याच्या पाठीवरून त्यांचा दयार्द्र हात अनाहूतपणे फिरतो. अंतरीच्या दैवी शक्तीचा वडिवार माजवून स्वतःभोवती तेजोवलय निर्माण करण्याची भावना त्यांच्या जीवनात कोठेही आढळत नाही. श्री चक्रधर, नागदेव, म्हाइंभट, महदाइसा यासारख्या महानुभाव पंथातील थोर व्यक्तींनाही खिळवून टाकण्याचे सामर्थ्य या बाह्यतः वेड्याबागड्या वाटणाऱ्या पुरुषात होते ! त्यांची वाचासिद्धी सामान्यांच्या मार्गदर्शनासाठी असे. त्यांच्या शिव्या म्हणजे भक्तजनांवर होणारा पुष्पवर्षावच होता. मातंगापासून दीक्षितांपर्यंत होणारा त्यांचा मुख्य संचार त्यांच्या समभावाचे दर्शन घडवितो. परमार्थाच्या रंगात रंगलेले श्रीप्रभु लौकिक वर्णाश्रमांच्या चौकटी जुमानीत नाहीत. वादविवादात, तत्त्वनिरूपणात गढलेले श्रीप्रभु आपल्याला आढळणार नाहीत. पण त्यांच्या जीवनातील अनेकविध प्रसंग अत्यंत बोलके, सूचक आणि क्रांतिकारक असे आहेत. त्यांच्या अंतरंगाचा शोध जितक्या आत्मीयतेने जिव्हाळ्याने घ्यावा, तितके ते अधिकाधिक प्रत्ययकारीच आढळते. त्यांचे व्यक्तित्व हे बाह्यतः एक कोडे वाटले, तरी त्यातील 'थोर कणवे'चा धागा आपल्या हाती लागताच ते उलगडू लागते आणि बहुचित्रदर्शकाप्रमाणे ते हृद्य आणि मनोरम वाटू लागते.

---










प्रा. सदाशिव आठवले

# मराठ्यांच्या सत्तेमागील तत्त्वांचा शोध

महाराष्ट्रात इ. स. १६७४ मध्ये रायगड किल्ल्यावरून मराठ्यांचे स्वतंत्र राज्य निर्माण झाल्याचे व छत्रपती शिवाजी हा त्या राज्याचा अभिषिक्त राजा म्हणून सिंहासनाधिष्ठित झाल्याचेही अधिकृतपणे जाहीर झाले. शिवाजीच्या वंशजांची ही गादी केवळ गादी या तांत्रिक अर्थाने कदाचित आजही साताऱ्यास आहे असे म्हणता येईल. परंतु मांडलिकी दर्जा असलेले साताऱ्याचे संस्थान इ. स. १८४८ मधेच खालसा करण्यात आले. इ. स. १८१८ मधे पुण्याची पेशवाई संपुष्टात आली, आणि सातारचे राज्यकर्ते इंग्रज राज्यकर्त्यांच्या हातातील खेळण्यांसारखे राहिले आणि त्यापूर्वीही जवळ जवळ शंभर वर्षे हे छत्रपती स्वतंत्र होते असे मुळीच म्हणता येणार नाही. त्या काळात ते इंग्रजांच्या ऐवजी पेशव्यांच्या, म्हणजे त्यांनीच नेमलेल्या पंतप्रधानांच्या, हातातील बाहुली होते एवढेच ! परंतु मराठ्यांची सत्ता असा जेव्हा व्यापक शब्दप्रयोग आपण करतो तेव्हा प्रत्यक्ष शिवाजीच्या वंशजांच्या हातात कितपत सत्ता होती हा मुद्दा गौणच मानला पाहिजे. सत्ता छत्रपतींची असो, पेशव्यांची असो किंवा शिंदे होळकरांसारख्या सरदारांची असो; जर महाराष्ट्रातील लहानमोठ्या लढवय्यांनी आणि मुत्सद्यांनी मिळून देशविस्तार केला असेल आणि इतिहासाला बरे वाईट वळण लावले असेल तर ते सर्वच मराठ्यांची सत्ता म्हणून ओळखले आणि तपासले गेले पाहिजे. प्रत्यक्षात इ. स. १८०२ च्या इंग्रज आणि पेशवे यामधील तहाने पेशव्यांचे स्वातंत्र्य संपुष्टात आले. पुढील काही वर्षांत शिंदे, होळकर, गायकवाड इत्यादी मराठी सरदारांशी इंग्रजांनी मुकाबले केले. आणि प्रत्येकाला मांडलिकी दर्जा मान्य करावयास भाग पाडले. इ. स. १८१८ मध्ये पेशव्यास तर पदच्युतच करण्यात आले. आणि स्थूलमानाने ह्याच वर्षी मराठी सत्तेची अखेर झाली असे मानावयास हरकत नाही. म्हणजे १७ व्या शतकाचें शेवटचे पाव शतक ते १९ व्या शतकाचे पहिले पाव शतक ह्या कालावधीत साधारणतः सव्वाशे-दीडशे वर्षे ज्याला मराठ्यांची सत्ता म्हणता येईल असे काहीतरी अस्तित्वात होते.

वर दिलेल्या कालखंडात मराठ्यांनी जे केले त्याला राज्य चालविणे असे म्हणता येईल की नाही ह्याविषयी वाद होऊ शकेल. त्यांनी जे केले त्याने खुद्द त्यांचे व इतरांचे कल्याण झाले की अकल्याण झाले असाही प्रश्न उपस्थित करता येईल. त्यांच्या हेतूंविषयी व ईप्सितांविषयी शंका प्रदर्शित करणेही चुकीचे ठरणार नाही. परंतु काही असले तरी हे शतक-दीड शतक मराठ्यांनी सत्ता गाजविली, ह्या काळात मराठ्यांची सत्ता ही एक शक्ती होती ह्याविषयी मात्र वाद होऊ शकत नाही.

आता प्रश्न असा की हे जे एक मराठ्यांच्या सत्तेचे सामर्थ्य होते ; मराठे जी 'मुलुखगिरी' वगैरे करीत होते त्यापाठीमागे नेमकी प्रेरणा काय होती ? हा सर्व उद्योग केवळ सत्ता गाजविण्यासाठी आणि सत्तेमुळे मिळणारे सर्व प्रकारचे ऐश्वर्य उपभोगण्यासाठीच होता की मराठ्यांना काही तत्त्वासाठी लढायचे होते, कोणत्यातरी ध्येयामागे धावायचे होते ?

एखाद्या सत्तेच्या तात्त्विक बैठकीविषयी बोलताना स्थल आणि काल विसरता येत नाही. वेदकालीन भारतातील एखाद्या नृपतीचे ध्येय किंवा ग्रीसच्या सम्राट अलेक्झांडरचे उद्दिष्ट ही एक असू शकत नव्हती; किंवा अशा एखाद्या प्राचीन राज्यकर्त्याचे ध्येय आणि आजची एखादी












साम्यवादी किंवा लोकशाही राज्यसत्ता ह्यांच्यातील मूलभूत बैठकही खूपच निराळी दिसून येणे स्वाभाविकच आहे. महाराष्ट्र हा प्रदेश, तेथील लोक आणि सतराव्या शतकाची अखेर ह्या गोष्टी लक्षात घेऊनच मराठ्यांच्या ध्येयधोरणाविषयीचे प्रश्न उपस्थित करता येतील. मराठ्यांनी मोगल बादशहाविरुद्ध तलवार उपसण्याऐवजी शांततामय सत्याग्रहाची किंवा 'घेराओ' ची चळवळ का केली नाही किंवा लोकहिताचे दृष्टीने तत्कालीन मराठी राज्यकर्त्यांनी कुटुंबनियोजनाचा कार्यक्रम हाती का घेतला नाही अशा तऱ्हेचे प्रश्न उपस्थित करणे अत्यंत अप्रस्तुत होईल. मराठ्यांच्या उद्दिष्टांची चर्चा करताना महाराष्ट्रात त्या काळातील लोकांच्या विचारविश्वात कोणती ध्येये असू शकली असती हे लक्षात घेऊनच चिकित्सा झाली पाहिजे; आणि म्हणून मराठ्यांच्या राजनीतीतील तत्त्वे शोधण्याचे काम खुद्द तत्कालीन मराठ्यांच्या विचारातून व आचारातून जे दिसेल त्याच्या अनुरोधानेच व्हावयास पाहिजे. अगदी एखाद-दुसऱ्या मराठ्याच्या उक्तीत किंवा कृतीत जरी काही ध्येयासक्ती दिसली तरीही तत्कालीन विचारविश्वात तशी तत्त्वे व तशी ध्येये असू शकत होती असे म्हणता येईल. आणि बहुसंख्य मराठ्यांनी त्यांचा पाठपुरावा केला असेल तर त्या सगळ्यांचेच राजकीय जीवन तत्त्वनिष्ठ होते असेही म्हणता येईल. मात्र एखाद्या माणसाच्या जीवनात किंवा एखाद्या दुसऱ्या ग्रंथात काही तत्त्वांचा पाठपुरावा असला आणि एकूण शंभर दीडशे वर्षांच्या इतिहासात सामान्यतः बहुतेक सर्व मराठे विपरीत वर्तन करीत होते असा प्रकार आढळला तर ती एखादी व्यक्ती किंवा तो एखादा ग्रंथ केवळ अपवाद म्हणून त्याची योग्य ती दखल घेऊन सोडून देणेच योग्य होईल. तसेच जी काही तात्त्विक बैठक असेल ती तत्कालीन मराठी व भारतातील महाराष्ट्रीयेतर जनतेला व तसेच अभारतीयांना समजली की नाही, समजली नसेल तर का समजली नाही आणि त्याचबरोबर त्यांचे जे समज किंवा गैरसमज झाले असतील ते बरोबर की चूक ह्याचाही खल तत्कालीन कागदपत्रांच्या साहाय्यानेच केला गेला पाहिजे.

शिवाजीने दिलेल्या स्वराज्याची तयारी त्याच्या आधीच हळू हळू अंशतः सांस्कृतिक व अंशतः राजकीय पातळीवरून होत होती असे पुष्कळदा म्हणण्यात येते. ज्ञानेश्वरापासून रामदासापर्यंतच्या संतांनी धार्मिक जागृती करून जनमानसात काही भूमिका निर्माण करून ठेवली होती. तसेच दिल्लीचे मोगल आणि दक्षिणेतील मुसलमानी सत्ता ह्यांच्या सेवेत कित्येक मराठ्यांनी राजकारणाचे व लष्करी हालचालींचे ज्ञानही मिळवून ठेवले होते, असे पुष्कळदा सांगण्यात येते. ह्या ठिकाणी तपशीलात शिरून ह्या प्रश्नाचा उलगडा करण्यास फारसा अवकाश नाही. तथापि ज्ञानेश्वर, तुकाराम इत्यादी संतांच्या वतीने त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक कार्याविषयी जो दावा मांडला जातो[१] तो फारसा टिकणारा आहे असे वाटत नाही. "ठेविले अनंते तैसेचि रहावे" असा उपदेश करणाऱ्या संतांकडून सामाजिक किंवा राजकीय क्रांतीचा संदेश मिळणे कठीणच. त्याचप्रमाणे संतांनी काही प्रमाणात सामाजिक समता आणली आणि एकसंध मराठी समाज निर्माण करण्यास हातभार लावला हेही म्हणणे टिकू शकणार नाही. कारण पंढरपूरच्या वारीपुरता भेदभाव नष्ट होण्याने वर्ण आणि जातिव्यवस्था मोडली जाणे शक्य नव्हते. शूद्रांना ईश्वरप्राप्ती शक्य आहे असे म्हटल्याने आणि असा जाहीर पुकारा केल्यानेही विशेष काही साधत नाही, साधलेले नाही, शूद्रांचे सामाजिक स्थान उंचावले नाही. उच्च–नीच, ब्राह्मण-ब्राह्मणेतरादी भेदांचा नायनाट होण्याचे दृष्टीने किंवा त्यांची तीव्रता कमी होण्याचे दृष्टीनेही संतांच्या कार्यातून काहीच निघाले नाही. शेकडो हजारो लोकांनी पंढरपूरच्या पदयात्रा करून काय साधण्यासारखे होते ? त्यापेक्षा हे वारकरी शिवाजीच्या सैन्यात सामील होते तरी त्यांचा काही ना काही उपयोग झाला

१. Rise of the Maratha Power– Ranade M. G. Bombay March 1961








असता. शिवाजीच्या पूर्वीचे व त्याचे समकालीन अशा सर्व संतांमधून एकटा रामदासच थोडासा वेगळा दिसतो. रामदासाच्या उपदेशातूनही ईश्वर-भक्तीचा आग्रह आहे. त्याच्या संदेशातून परस्पर-विसंगतीही क्वचित दिसतात. परंतु तरीही- "आधी प्रपंच करावा नेटका" किंवा "मराठा तितुका मेळवावा" हे सांगणारा रामदास शिवा-जीच्या कार्याचे स्वरूप व महत्त्व जाणतो आहे एवढे तरी स्पष्ट दिसते. ह्या दृष्टीने विचार करता, रामदास शिवाजीची भेट केव्हा झाली, रामदास शिवाजीचा गुरू होता किंवा काय वगैरे सारखे महाराष्ट्रात फार माजलेले वाद निरर्थक आहेत. शिवाजीला जे कार्य करायचे होते त्याची स्फूर्ती ही त्याची एकट्याची आणि स्वतंत्र होती. त्याची कार्यपद्धतीही स्वतंत्रपणे त्यानेच आखलेली होती. कोणत्याही बाबतीत रामदासासारख्याला गुरू करण्याची आवश्यकता त्याला भासली असावी असे त्याच्या चरित्रावरून दिसत नाही. परंतु मात्र शिवाजीच्या कार्याचे महत्त्व जाणणारा आणि त्याचा निष्ठेने प्रचारही करणारा रामदास हा एकमेव विचारवंत आणि संत आहे हे लक्षात घेतलेच पाहिजे.

मुसलमानी सत्ताधीशांच्या सेवेत शिवाजी-पूर्वीच्या मराठ्यांनी राजकीय आणि लष्करी अनुभव मिळविला होता हे खरे, पण त्या अनुभवाचा ते काय उपयोग करणार होते? कोणत्या तरी परकी जुलमी राज्यकर्त्याची सेवा, अधिकाधिक सेवा हेच झाले असते. शिवाजीच्या पित्याचा, शहाजीचा, जन्म असा मुसलमानी राज्यकर्त्यांच्या सेवेतच गेला. त्याला पुष्कळदा मराठी स्वराज्याचा 'संकल्पक'[१] वगैरे म्हणण्यात येते. परंतु हेही प्रत्यक्ष ऐतिहासिक घटनांच्या संदर्भात तपासून पहाता टिकणारे नाही. शिवाजीची धडाडी व स्वतंत्र प्रतिभा शहाजीमध्ये असती किंवा निदान ती त्याला चांगली आकलन होऊ शकली असती तर त्याला मोकळ्या मनाने सरळ आपल्या मुलाकडे सामील होण्यापासून कोण अडवू शकणार होते?

तेव्हा शिवाजी हा त्याच्याआधी निर्माण झालेल्या काही एका अनुकूल परिस्थितीचा परिपाक आहे अशा तऱ्हेचा इतिहास मांडणे बरोबर नाही. शिवाजीचे म्हणून जे आहे ते महाराष्ट्राच्या इतिहासात त्याचे एकट्याचेच आणि पूर्णतया स्वतंत्र असे आहे. अर्थात शिवाजीने जे केले त्याला त्याच्यापूर्वीच्या जगाच्या किंवा भारताच्या इतिहासात अगदी तोडच नाही असे मात्र नाही. मुसलमानी अरेरावीविरुद्ध रजपूत राजे झगडून झगडून नामशेष झाले होते. विजया-नगरसारख्या स्वतंत्र राज्यांची स्थापना शिवाजीच्या पूर्वीचीच आहे. तेव्हा शिवाजीने महा-राष्ट्रात जे केले ते भारताच्या इतिहासात प्रथमच घडत होते असे नाही. तथापि रजपूत राजे, विजयानगरचे राज्यकर्ते वगैरे सर्व हतबल झाल्या-नंतर जुलमी मुसलमानी सत्तेच्या वरवंट्याखाली सर्व देश रगडला जाण्याची परिस्थिती निर्माण झाली असताना १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात शिवाजीने जो एक नवीन उठाव मांडला त्याचे आगळे महत्त्व मान्य झाले पाहिजे.

शिवाजीने स्वराज्याचा पुकार केला. राज्य कितीही लहान असले, अगदी एक किल्लाच असला तरी मी त्याचा स्वतंत्र सार्वभौम सत्ता-धीश आहे; दिल्लीच्या किंवा विजापूरच्या पातशहाचा अंकित म्हणून, सुभेदार किंवा देशमुख म्हणून मी रहाणार नाही. अशा तऱ्हेचीही भूमिका इतर मराठ्यांना, अगदी शहाजीलासुद्धा, न समजणारी आणि समजली तरी न मानवणारी होती. कुठल्यातरी पातशाहीची सेवा पत्करून आपला उत्कर्ष साधावयाचा असा विचार शिवाजी करता तर मरतेसमयी त्याच्याकडे जे चार जिल्ह्यांचे स्वराज्य होते आणि कोटी दोन कोटींचा खजिना होता त्याच्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक मोठे असे वैभव तो मिळवू शकला असता. ह्या पद्धतीने शहाजीने कर्नाटकात पुष्कळ साधल्याचा दाखला शिवाजीसमोर होताच, परंतु शिवाजीला ते नको होते. आपण परकी सत्ता झुगारून देऊ शकतो; आपले आपण स्वतंत्र राज्य करू शकतो

१. शहाजी– गो. स. सरदेसाई, मुंबई १९३५ पृ. ८४










हे शिवाजीला दाखवायचे होते. आणि म्हणूनच केवळ पैशाची आणि प्रदेशाची मोजदाद केली तर शिवाजीने जे कमावले ते मूठभर दिसले तरी तात्त्विक दृष्टचा ते पृथ्वीमोलाचे होते. ग्रँट डफने शिवाजीच्या कार्याचा आढावा घेताना हे अत्यंत प्रांजलपणे मान्य केले आहे.[१] शिवाजीने हिंदुत्वाची कांस धरली हे खरेच, पण ह्यांचा अर्थ तो धर्मांध होता आणि अन्य धर्मीयांना नेस्तनाबूत करण्यासाठी सिद्ध झाला होता असेही नाही. स्वतःच्या सैन्यात अनेक लहानमोठ्या जागांवर त्याने मुसलमानांच्या नेमणुका केलेल्या होत्या. मुसलमानांच्यातील मुल्ला, फकीर वगैरेंना तो आदराने वागवी. मशिदींसारख्या वास्तूंची मोडतोड करू नये असे त्याचे सक्त हुकूम असत. परंतु मुसलमानांच्या राजवटीखाली हिंदूंना धर्मस्वातंत्र्यच रहात नव्हते. आणि ते त्यांना प्राप्त करून देणे हे त्याने आपले कर्तव्य मानले. त्याचा लढा हा धर्मस्वातंत्र्याचा लढा आहे, हे स्वातंत्र्य मुसलमान, ख्रिश्चन वगैरे सर्वांना तो द्यावयास तयार होता, परंतु त्यांना मात्र ते घेऊ द्यावयाचे आणि बहुसंख्य हिंदूंना ते न मिळाले तरी चालेल, त्यांच्यावर अन्याय झाला तरी चालेल असला निधर्मीपणा मात्र सुदैवाने त्याच्यात नव्हता. जे स्वतंत्र राज्य निर्माण करावयाचे त्यात रयतेला धर्मस्वातंत्र्य तर आहेच पण त्याखेरीज त्या रयतेला त्यांच्या दैनंदिन आर्थिक आणि सामाजिक जीवनात अधिक सुखी करण्याचाही प्रचंड खटाटोप शिवाजीने आरंभिला. ठिकठिकाणी जनतेला पिळून कर वसूल करणाऱ्या व हरतऱ्हेची अनन्वित कृत्ये करणाऱ्या देशमुख, देशपांड्यांविरुद्ध तो उठला. वंशपरंपरा इनामे आणि वतने उपभोगिण्याच्या परंपरा मोडून, व सरंजामदारांचा नायनाट करून मध्यवर्ती सत्ता बळकट करणे आणि त्या द्वारा रयतेला अधिक सुखी करणे हे त्याने नव्याने बांधलेल्या राज्ययंत्रणेचे उद्दिष्टही स्पष्ट दिसण्यासारखे आहे.

परंतु ही नवी सृष्टी निर्माण करताना शिवाजीने कळत नकळत एक असा मार्ग अवलंबिला की ज्यामुळे मराठ्यांच्या सत्तेच्या पुढील इतिहासास काही भयंकर वळण लागले. हा मार्ग म्हणजे लुटीचा. शिवाजीने सुरत शहराच्या ज्या लुटी केल्या त्या प्रसिद्धच आहेत परंतु सुरतेखेरीज आणखी पंचवीस तीस ठिकाणे तरी शिवाजीने लुटलेली आहेत. त्या लुटीतून द्रव्य मिळवायचे आणि ते स्वराज्याच्या कामी लावावयाचे हा त्याचा हेतू जरी मान्य केला तरीही फक्त पातशाही खजिनाच लुटणे अशासारखे काही सूत्र न ठेवता सरसहा सर्व नागरिकांना, मुसलमानांना आणि हिंदूंनासुद्धा आणि श्रीमंताना तसेच गरिबांनाही त्याच्या सैन्याने सारखेच ओरबाडून काढलेले तत्कालीन कागदपत्रांवरून दिसते. ही पद्धती योग्य होती काय ? निरपराध नागरिकांवर असे जुलूम करणे नैतिक दृष्टचा समर्थनीय आहे काय ? अशा प्रश्नांची उत्तरे एकंदर सर्व काळातील व जगाच्या सर्व भागातील युद्धनीतीच्या तत्त्वांच्या संदर्भात आणि विशेषतः सतराव्या शतकाच्या परिस्थितीच्या अनुरोधाने शोधून काढली पाहिजेत. मराठी सत्तेच्या अखेरीपर्यंत मराठ्यांनी हा लुटालुटीचा उद्योग सतत चालू ठेवलेला असल्यामुळे शिवाजीच्या व त्यांच्यानंतरच्या मराठी सत्ताधीशांनी केलेल्या सर्वच हल्ल्यांचा, जाळपोळींचा व लुटींचा साकल्याने विचार केला पाहिजे. आणि म्हणूनच तो ह्या लेखात थोडा पुढे केला जाईल.

शिवाजीच्या मृत्यूपासून (इ. स. १६८०) ते जवळ जवळ पहिल्या बाजीरावास पेशवाईची वस्त्रे मिळून (इ. स. १७२०) छत्रपती शाहूचा मुखत्यार म्हणून तो मुलूखगिरी करू लागेपर्यंतच्या चाळीस वर्षांच्या काळात अनेक घडामोडी झाल्या, आणि मराठी सत्तेच्या स्वरूपात अनेक स्थित्यंतरे झाली. शिवाजीनंतर गादीवर आलेले संभाजी व त्याच्या पाठोपाठ राजाराम ह्यांच्या कारकीर्दीत औरंगजेबाने दक्षिणेत तळ ठोकून मराठ्यांचा बीमोड करण्याचाच चंग बांधला होता. परंतु ती सत्ता मोडली नाही. पुष्कळ मराठ्यांनी शिवाजीने सुरू केलेल्या कार्याशी व आपल्या स्वामीशी एकनिष्ठ राहून राज्यरक्षणासाठी

१. A History of the Mahrattas—Duff, Grant; Vol I.







सर्वस्वाचा त्याग करण्याची तयारी दाखविली हे खरेच. छत्रपती राजारामाच्या काळात अनेक मराठ्यांनी अशी ध्येयनिष्ठा दाखविल्यामुळे सबंध मराठी समाज कोणत्यातरी ध्येयाने प्रेरित होऊन मार्गक्रमण करीत होता असा आभास निर्माण होतो. परंतु तत्कालीन सर्व कागदपत्र काळजी-पूर्वक पाहिले की हा आभासच आहे, सत्य नाही हेही स्पष्ट होऊ लागते. ह्या काळात फंदफितुऱ्या होत होत्या. अनेक मराठे मुसलमानांस मिळत होते आणि राज्यरक्षणाच्या कामास मराठ्यांना जुंपावयाचे असेल तर इनामांची आणि वतनांची लालूच दाखविण्याशिवाय गत्यंतर नव्हते. ह्याची जाणीव छत्रपती राजाराम व त्याच्या निकट-वर्तीयांस स्पष्टपणे आलेली होती. आणि म्हणूनच शिवाजीचे सरंजामशाही मोडण्याचे कार्य बिघडले तरी चालेल पण संभाजीने गमाविलेले राज्य काही करून परत मिळविलेच पाहिजे असा आग्रह धरून राजारामाने इनामे व वतने परत देण्यास सुरुवात केली.[१] कितीतरी जुनी वतने पुन्हा देण्यात आली आणि कित्येक नवी देण्यात आली. आणि ही सगळी पुन्हा वंशपरंपरा ! अशा तऱ्हेने केलेल्या खैरातींसंबंधीची अनेक पत्रे उपलब्ध आहेत.[२] राज्यरक्षण झाले खरे पण त्यासाठी फार मोठी किंमत द्यावी लागली. म्हणजे शिवाजीने सुरू केलेली आर्थिक क्रांती थांबवून पुन्हा पाठीमागे जावे लागले. जागोजागी नव्या समस्या आणि नवे गोंधळ निर्माण करावयास शेकडो वतनदार निर्माण झाले.

राजारामाच्या मृत्यूनंतर (इ. स. १७००) काही वर्षांनी औरंगजेबाने आपल्या कैदेतून मोकळा केलेला संभाजीचा मुलगा शाहू हा साताऱ्यास छत्रपती म्हणून विराजमान झाला. (इ. स. १७०८) तांत्रिकदृष्ट्या हा छत्रपती आता पहिल्या तीन छत्रपतींसारखा स्वतंत्र सत्ताधीश नव्हता त्याने औरंगजेबाची ताबेदारी मान्य केली होती. शिवाजीने ज्यासाठी आटापिटा केला आणि जे संभाजी आणि राजाराम यांच्या कारकीर्दीतही रक्षिले गेले ते स्वतंत्र राज्याचे तत्त्व इथे सुटले. राजारामपर्यंत ह्या स्वराज्यतत्त्वाविषयी मराठ्यांचा आग्रह असावा असे राजारामाच्या बखरीवरून दिसते " मराठी याणी चाकर म्हणवावे, यांचे राज्य राखावे, यांच्या हातून चाकरी घ्यावी, परंतु ते चाकर म्हणवीत नाहीत. सबब त्यांचे पारपत्य करावे " असा औरंगजेबाचा दृष्टिकोन ह्या बखरीत नमूद झालेला आहे.[३] आता छत्रपती शाहूनंतरची जी मराठी सत्ता आहे ती पुढील काळात भारताच्या सर्व भागांना जाणवली. तिचा खूप विस्तार झाला. दशदिशांना तिची झळ लागली परंतु घटनात्मकदृष्ट्या राजा-रामानंतरचे सर्व मराठे सत्ताधीश म्हणजे दिल्ली-पतीचे लहानमोठे सेवकच.

वर म्हटल्याप्रमाणे शाहूने मोगलांची ताबेदारी पत्करली आणि अशा छत्रपतींचे पंतप्रधान म्हणून पेशव्यांनी आणि छत्रपतींचे किंवा पेशव्यांचे सरदार म्हणून शिंदे होळकर वगैरेंनी राज्यविस्तार केला. ह्यात शिवाजीचे मूळ स्वराज्याचे तत्त्व सुटले हे खरेच. परंतु ह्या गोष्टीचा काही विचारवंत फारच बाऊ करतात तो मात्र योग्य वाटत नाही. राजकारण म्हणून तात्पुरतो तत्त्वाला थोडीशी मुरड पडली तर विशेष काही हानी होते असे नाही. ते तत्त्व मनात पक्के असेल आणि संधी मिळताच पुन्हा ते प्रस्थापित करण्याची महत्त्वाकांक्षा आणि धमक असेल तर व्यवहार म्हणून कोणत्याच तडजोडीला प्रत्यवाय नसावा. आणि म्हणूनच पुढील काळात मराठ्यांनी प्रत्यक्षात काय केले हे आता तपासून पाहिले पाहिजे.

जवळ जवळ सर्व १८ वे शतकभर पेशवे, शिंदे, होळकर, भोसले वगैरे मराठी सत्ताधीश

---

१. छत्रपती राजाराम महाराज यांची बखर– मल्हार रामराव चिटणीस, संपा. सौ. प्रमोदिनी जुवेकर पुणे, १९६३ (परिच्छेद ३१)

२. पेशवे दफ्तर– ३१/५५, ३१/५७, ३१/५८, ३१/५९ वगैरे

३. राजाराम बखर (परिच्छेद ५५)










कर्नाटक, गुजराथ, राजस्थान, ओरिसा, माळवा, बंगाल आणि पंजाबपावेतो सतत स्वाऱ्या करीत होते; मुलूख मिळवीत होते, गमावीतही होते, निरनिराळ्या राजेरजवाड्यांकडून खंडण्या गोळा करीत होते आणि त्याचप्रमाणे अनेक ठिकाणी मुलुखाची लुटालूट आणि जाळपोळही करीत होते. ह्या सर्व गोष्टी मराठ्यांनी भारतावर तत्त्वतः सार्वभौम राज्य करणाऱ्या बादशहाचे प्रतिनिधी आणि रक्षक म्हणून चालविल्या होत्या. आता बाह्यात्कारी बादशहाचे अंकित म्हणून परंतु प्रत्यक्षात स्वतःच सत्ताधीश बनून प्रदेश काबीज करणे, तेथे आपला अंमल बसविणे, पाठोपाठ त्या त्या ठिकाणी सुव्यवस्था निर्माण करणे आणि तत्कालीन मूल्यांना अनुसरून जनतेला सुखा-समाधानाची वाटेल अशी राजवट निर्माण करून अखिल भारताचे नियंते म्हणून आपले आसन बसविणे अशा तऱ्हेचे धोरण असावयास काहीच हरकत नव्हती. परंतु ह्या शतकाच्या इतिहासाचे जे अस्सल इंग्रजी, मराठी, फारशी इत्यादी भाषांतील जे तत्कालीन कागदपत्र उपलब्ध आहेत त्यावरून एकंदर मराठ्यांपुढे किंवा पेशवे, शिंदे वगैरेंपैकी एखाद्या सत्ताधीशापुढेही अशी एखादी योजना होती, अशा एखाद्या ध्येयाच्या अनुरोधाने वाटचाल करण्याची आकांक्षा होती असे दिसत नाही. क्वचित केव्हातरी काशी, प्रयाग ह्यासारखी तीर्थक्षेत्रे मुसलमानांच्या तावडीतून मुक्त करून आपल्या ताब्यात आणून हिंदू धर्माची सेवा करण्याचा भोळा भाव दिसतो.[१] परंतु ह्यासाठीही मोठा निकराचा प्रयत्न झाला आहे किंवा त्याची फार तळमळ लागून राहिली आहे असे दिसत नाही तर मग सालोसाल प्रचंड घोडदळे बरोबर घेऊन, भारताच्या चारी दिशांना भराऱ्या मारून मराठ्यांना साधायचे होते तरी काय, असा प्रश्न स्वाभाविकच पडतो. आणि ह्या प्रश्नाचे उत्तरही तत्कालीन कागदपत्रातून अक्षरशः हजारो ठिकाणी दिलेले आढळते.

रिचर्ड ओवेन हा इंग्रज आपल्या इ. स. १७६१ साली प्रसिद्ध केलेल्या एका छोट्याशा पुस्तकात म्हणतो की, " मराठे हे शत्रू म्हणून सर्वस्वाचा नाश करणारे आहेत आणि मित्र म्हणून अत्यंत बेभरंवशाचे आहेत. शत्रूचा मुलूख ते जाळून, लुटून फस्त करतात, तर दोस्तांकडून ते अत्यंत लोभीपणाने पैसे उकळीत रहातात "[२] ह्यानंतर सुमारे वीस पंचवीस वर्षांनी म्हणजे मराठ्यांची मुलुखगिरी ज्यावेळी देशाच्या सर्व भागातून जोमदारपणे चालली होती त्यावेळचा एक मुसलमान नवाब लिहितो की, " मराठे हे सगळ्या मानवजातीला लुबाडून आपले पोट भरण्याच्या उद्योगाला सज्ज झालेले लोक आहेत. हे सगळेच बुभुक्षित आहेत. आणि त्यातल्या त्यात मुळात भिकारी, भिक्षुक असलेले त्यांचे ब्राह्मण नेते जे आहेत ते तर दुसऱ्याकडून मिळेल ते उकळण्यापलिकडे दुसरा धंदाच जाणीत नाहीत. कोणी रिकाम्या हाताने त्यांच्याकडे गेला तर त्याच्या अंगावरचे कपडे काढून घेऊन ते तत्काळ त्याला ईश्वरासन्निध रवाना करतात. "[३] अशा प्रकारचे तत्कालीन इंग्रज व मुसलमानांचे कितीतरी अभिप्राय दाखविता येतील. परंतु ही अन्य-धर्मीयांची मते म्हणून पूर्वग्रहदूषित आणि अतिशयोक्त अशी असणारच. असे म्हणता येईल; आणि त्यात थोडा सत्यांशही असेल. परंतु विशिष्ट प्रकारचे पूर्वग्रह निर्माण व्हावेत असे मराठ्यांनी काही केले किंवा नाही आणि जे इंग्रज मुसलमानांनी वाढवून सांगावे ते मुळात

१. पेशवे दप्तर २१/५६३ इ.

२. An account of the war in India between the English and the French on the coast of Coromadal Etc. – Owen, Richard. Cambridge, 1761

३. Seir Mutaqherin– Seid– Gholam– Hossein– Khan; Calcutta- 1902, ( Vol. 4 p. p. 23–25 Vol. 3 Page 385 )







थोडे कमी का होईना पण होते की नाही हे पाहिलेच पाहिजे. आणि म्हणूनच भारतातील मराठ्यांखेरीज अन्य हिंदूंची मराठ्यांविषयीची मतेही अशीच अत्यंत बोलकी आहेत हे ध्यानी घेणे आवश्यक आहे. ह्या संदर्भात इ. स. १७८७ मधले एकच पत्र उदाहरणादाखल पाहिले तरी पुरे. जोधपूर येथून कृष्णाजी जगन्नाथ पुण्यास पंतप्रधानास कळवितो की, " राजपूत सरदारांचे म्हणणे की तुर्कापेक्षा हिंदू राज्य चांगले, पेशवा साहेबांचे ब्राह्मणी राज्य बहुतच उत्तम. मामलत द्यावी यात गुंता तिलप्राय नाही. परंतु राज्य उच्छेद होऊं लागले तर लढाई घेणे प्राप्तच आहे. आम्ही अनादी कालापासून जमीनदार आहोत व बादशाही प्रबळ होती तेव्हाही आम्ही आमचे रक्षण केले आहे. "[१] ह्यात जोधपूरच्या वकिलाने ज्या ज्या हिंदू संस्थानिकांशी मराठ्यांचा मुकाबला झाला त्यांचे मनोगत स्पष्टपणे उघडे करून दाखविले आहे. मुलखाचा उच्छेद होऊ नये रयतेस शांती मिळावी, उभी पिके तुडविली जाऊ नयेत अशी भावना राजपूत राजांसारख्यांनी ठेवली ह्यांत त्यांचे काय चुकले? ही भावना समजून घेण्याचा, अन्य सत्ताधीशांशी व रयतेशी काही एका उच्च भूमिकेवरून चांगले समजुतीचे व स्नेहभावाचे संबंध निर्माण करण्याचा प्रयत्न मराठ्यांनी केव्हाही केलेला दिसत नाही. आणि ह्याचे सरळ कारण असे आहे की त्यांना ते करायचेच नव्हते. तेव्हा आता पुन्हा असा प्रश्न की मग त्यांना करायचे तरी काय होते? काय मिळवावयाचे होते? ह्याची उत्तरे देणारी अनेक अस्सल पत्रे उपलब्ध आहेत. ती खुद्द मराठ्यांची, मराठ्यांनी मराठ्यास लिहिलेली आणि म्हणून साक्षात् त्यांचे मनच सांगणारी अशी ही पत्रे आहेत. तिथे अन्यधर्मीयांचे, अन्यदेशीयांचे किंवा अन्यप्रांतीयांचे पूर्वग्रह आहेत, दुष्ट हेतू आहेत, त्यांनी खोटे चित्र उभे केले आहे वगैरे काहीही म्हणून आत्मवंचना करता यावयाची नाही.

जानेवारी १७२९ मध्ये बाजीराव पेशवा चिमाजीस लिहितो " जिकडे पैका मिळेल तिकडे जाणे. बहुत युक्तीने चौकशीने पैका मिळविणे. माळवा प्रांत लुटून टाकणे. आम्ही छत्रसालाचे मुलखात आलो आहोत, तुम्ही इकडे येऊ नये. तुम्ही तिकडे पोट भरणे, आम्ही इकडे भरतो. दोन्ही लष्करे ही एका जागा होऊन पैका कैसा मिलेल? "[२] एप्रिल १७३७ मध्ये बाजी भीवराव पेशव्यास लिहितो की तुमच्या आज्ञेप्रमाणे दतीयेकर वगैरे राजांकडून दांडगाईने पैसे वसूल केले आहेत[३] त्याच वर्षाच्या जूनमधे मराठी अधिकाऱ्यांच्या भीतीने रयता पळून जाऊन शहरे रिकामी झाल्याची हकीकत पिलाजी जाधव पेशव्यास कळविताना आढळतो.[४] मे १७३९ मध्ये मराठी सैन्याने रामनगरच्या रयतेची चिरगूट पांघरुणेसुद्धा पळविल्याबद्दलची हकीकत कृष्णराव महादेव चिमाजी आप्पास कळवितो.[५] इ. स. १७४७ मधे उत्तरेकडून पेशव्यास आलेल्या एका पत्रात म्हटले आहे " येथील लोक पैका आपल्या प्रतापाच्या भयेकरून देतात. फार कष्टी, न मागता देतात, दुःख वाटते. "[६] एवढ्या ह्या वाक्यावरूनसुद्धा मराठ्यांच्या उद्योगांची व त्यांनी निर्माण केलेल्या भयग्रस्त वातावरणाची कल्पना येऊ शकेल. इ. स. १७५२ मध्ये नानासाहेब पेशवा जयाजी शिंद्यास लिहितो की " वीस पंचवीस हजार फौज दादाबरोबर गुजराथेत पोट भरावयास रवाना केली. " त्याच पत्री फौज आपलाच देश लुटते हेही नानासाहेबाने कळविलेले आहे.[७] मराठी सैन्याने आपल्या मराठी प्रांतातच धुमाकूळ घालून लुटालूट करून लोकांचे हाल केल्याची आणखी कितीतरी अशीच प्रकरणे तत्कालीन पत्रांवरून दिसतात.[८] मराठ्यांचे अन्य सत्ताधीशांशी जे संबंध जुळत त्यात काही मोठा राजकीय विचार क्वचितच दिसावयाचा. बहुधा सर्व संबंध पैशा-

---

१. इतिहास संग्रह– जोधपूर येथील राजकारणे पत्र क्र. ३ संपा. द. ब. पारसनीस, मुंबई, १९१५
२. पेशवे दप्तर $\frac{१३}{३३}$ ३. पेशवे दप्तर $\frac{३५}{३४}$ ४. पेशवे दप्तर $\frac{३५}{६३}$ ५. पेशवे दप्तर $\frac{४०}{१४}$
६. पेशवे दप्तर $\frac{२१}{१९}$ ७. काव्येतिहास संग्रह, ९६ ८. कित्ता १११







अडक्याच्या अनुरोधाने ठरत. जुलै १७५७ मध्ये राघोबादादा सखाराम भगवंतास लिहितो, "तुम्ही सुजाउदौला याचे मदतीस जावे लागेल, परंतु तो रुपया देणार नाही असे म्हणता, एसीयासी रुपये न घेता त्याचे मदतीस जावे यात सरकारची किफायत कोणती? जिकडे रुपया मिळेल तिकडे जावे, मुलुख मिळवावा व जप्ती करावी. तुम्हास पुढे पाठवावयाचे कारण हेच. कोणाचे मदतीस पाठविले नाही. तीर्थयात्रेस पाठविले नाही."[१] डिसेंबर १७५९ मधील रामाजी अनंत ह्यास लिहिलेल्या एका पत्रात नानासाहेब पेशवा स्पष्ट लिहितो की बंगाल लुटून कोट दोन कोट रुपये कर्ज फेडणे आवश्यक आहे[२].

ह्या अशा प्रकारच्या धोरणामुळेच हिंदुस्थानातील सत्ताधीशांना व रयतेला मराठे हे आपले रक्षणकर्ते आहेत किंवा निदान चांगले राज्यकर्ते आहेत, ह्यांच्या अमलाखाली सुखशांती मिळेल असे कधीच वाटले नाही. असे वाटावे असे मराठ्यांनी कधी काही केलेच नाही. उलट सर्वांनी धास्ती खावी अशाच तऱ्हेचे मराठ्यांचे राजकारण होत राहिले. "मराठ्यांनी जनतेचा अगदी अंत पाहिला आणि म्हणूनच लोकांनी अहमदशहा अवदालीला विनंती अर्ज करून बोलावून घेतले असे सैरमुताखेरीनचा कर्ता म्हणतो.[३] प्रत्यक्ष अर्ज केला, आमंत्रण केले हा भाग जरी थोडा अतिशयोक्त मानला तरी हिंदुस्थानातल्या राजेरजवाड्यांना व लोकांना अवदालीपेक्षा मराठ्यांविषयी जास्त आपुलकी वाटावी असे मराठ्यांनी काही केले नव्हते हे मात्र खरेच. मार्च १७६० मधे राजा केशवराव पेशव्यास लिहितो, "अवदाली आला आहे. त्यास इकडील सरदारास त्याचेही भय व तुमचेही भय. त्यामुळे कोणास मिळतील सांगता येत नाही."[४] सदाशिवराव भाऊ विरुद्ध चितोडकर, उदेपूरकर, रामनगरकर, मारवाडकर वगैरे सगळे एक असल्याचे बखरकारही नमूद करून ठेवताना दिसतात.[५] प्रत्यक्षात पानिपतावर मराठ्यांना अवदालीशी जो सामना द्यावा लागला त्यात मराठ्यांच्या बाजने हिंदुस्थानातील सत्ताधीश लढले नाहीत, स्वस्थ मजा पहात राहिले हें ऐतिहासिक सत्य फार अर्थपूर्ण आहे.

पानिपतच्या अनुभवानंतरही आत्मनिरीक्षण करून आपल्या चुका सुधारून महाराष्ट्राबाहेरील जनतेचा किंवा राजेरजवाड्यांचा विश्वास संपादन करण्याचे दृष्टीने मराठ्यांनी काही केले असे दिसत नाही. खुद्द पेशवे आणि होळकर, गायकवाड शिंदे वगैरे सगळेच सतत सर्वत्र लुटालूटच करीत राहिले[६] मराठ्यांचे हे राजकारण, त्यांच्या सत्तेचे हे स्वरूप इ. स. १७९९ मधील खुद्द एका मराठ्यानेच थोडक्यात सांगितले आहे ते असे: "मुलुखाची लुटालूट, गाव जाळणे, ह्याचे नाव मराठी कावा."[७]

तर 'मराठी कावा' हा एकूण असा असल्यामुळे भारतात धर्मस्वातंत्र्यावर अधिष्ठित आणि रयतेला सुखकारक होईल असे नवे राज्य निर्माण करणे, कायदा जारी करणे, सुव्यवस्था निर्माण करणे, इंग्रजांसारख्या परकीयांना हाकून लावण्यासाठी सर्व भारतीय सत्ताधीशांची एकजूट करणे ह्या किंवा अशासारख्या कोणत्याही उच्च ध्येयांनी प्रेरित होऊन मराठ्यांनी कधी काही राजकारण केले असे आजिबात दिसत नाही. लूट करून पैसा मिळविणे ह्या पलीकडे त्यांना काही ध्येय किंवा धोरण होते असे तत्कालीन कागदपत्र सांगत नाहीत.

ह्या लेखाच्या सुरवातीच्या भागात शिवाजीच्या उच्च ध्येयांविषयी थोडेसे विवेचन केले आहे परंतु त्यानेही लुटी केल्या असे जर इतिहास

---

१. पेशवे दप्तर २१/१३४  २. काव्येतिहास संग्रह १६६

३. Seir Mutaqherin -Vol. 3, Page 385.  ४. पेशवे दप्तर २१/१८७

५. पानिपतची बखर— रघुनाथ यादव विरचित.

६. पेशवे दप्तर— २०/४६, २०/३८, ३०/१६६, ४१/३, काव्येतिहास संग्रह— १४३, २२३ इत्यादी.

७. काव्येतिहास संग्रह पृ. १३६








सांगतो तर तो तरी पूर्णतया ध्येयनिष्ठ होता असे कसे म्हणता येईल? असा प्रश्न साहजिकच येथे कोणीही विचारील आणि म्हणून ह्याबाबत थोडासा विस्तार करून, शिवाजीने केलेल्या लुटी व पुढे १८ व्या शतकात पेशवे, शिंदे होळकरादी मराठे सरदारांनी केलेल्या लुटी ह्यातला फरक स्पष्ट करणे आवश्यक आहे. दोन युद्धमान सत्ता जेव्हा एकमेकांच्या प्रदेशावर हल्ले करतात तेव्हा हा संघर्ष फक्त दोन्ही सैन्यांपुरता कधीच मर्यादित रहात नाही. सर्वसामान्य नागरिकांनाही त्याची झळ पोचतेच. आजकालच्या लढायातूनही बाँबहल्ले होतात तेव्हा आपआपल्या ठिकाणी सुखासमाधानाने जगत असलेल्या कित्येक नागरिकांच्या जीवितवित्ताची हानी होत असतेच. १७ व्या शतकातही अर्थात हे घडतच होते. शिवाजीने नागरिकांनाही लुटले हे निःसंशय. पण शत्रुप्रदेशातील नागरिकांना लुटणे आणि त्याप्रकारे "माझ्या अमलाखाली या नाहीतर असे हकनाक आपले घरदार, संपत्ती व प्राणहीं गमावून बसाल" अशा तऱ्हेचा धाक दाखविणे हे तत्कालीन राजनीतीस धरूनच आहे. ह्या संबंधात मल्हार रामराव चिटणीसाने आपल्या 'राजनीती' ह्या पुस्तकात जे एक सूत्र सांगितले आहे त्याने शिवाजीच्या लुटीच्या राजकारणावर उत्तम प्रकाश पडतो. चिटणीस म्हणतो, "संधी लक्षून शत्रू जिंकावा व शत्रूच्या प्रजा आहेत त्या जों कालपर्यंत आपल्या जाहल्या नाहीत तोवरी त्यास लुटाव्या, माराव्या, त्यांचा अनेक प्रकारे करून नाश करावा. आपल्या असे जाहल्यावरी त्यांचे पालन पुत्रवत् करावे"[१] शिवाजीने आपल्या सर्व लुटींचे संदर्भात सतत न चुकता हा दंडक पाळलेला दिसतो. शिवाजीच्याच दृष्टीने व पद्धतीने आणि त्याचा ध्येयवाद कायम ठेवून पुढच्या काळातील मराठ्यांनी शिवाजीसारख्याच लुटी केल्या असल्या तर तेही क्षम्यच नव्हे तर राजनीतीला धरूनच झाले असते. परंतु पुढील काळातील मराठ्यांनी मोठमोठ्या फौजा बाळगून 'पोटे भरावयाचा' उद्योग[२] केला आणि ह्यापलीकडे कोणतेही ध्येयधोरण ठेवले नाही हा इतिहास नाकारता येणार नाही. तत्त्वाचे किंवा ध्येयाचे दृष्टीने मराठ्यांच्या इतिहासात शिवाजी हा एक आणि एकच अपवाद झाला. आणि म्हणूनच मराठ्यांना शिवाजीपूर्वीही इतिहास नव्हता आणि शिवाजीनंतरही इतिहास नाही. मराठ्यांचा इतिहास म्हणजे शिवाजी आणि फक्त शिवाजीच!

---

१. राजनीती – काव्येतिहास संग्रह क्र. २३, पुणे, १८०९

२. इ. स. १८० सालच्या एशियाटिक ॲन्युअल रजिस्टरमधे मराठ्यांच्या ह्या युद्धजीवी राजकारणाचे स्वरूप चांगले उलगडून दाखविलेले आहे.



अनुक्रमणिका






# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट्. (पॅरिस)

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनी पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधी व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीर्घनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंवसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, कीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचे ठिकाण—

**प्राज्ञपाठशाला मंडळ, वाई** (सातारा)



